






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

[त्रैमासिक]

## ७७

संपादक— रामचंद्र श्रीपाद जोग

पौष–फाल्गुन १८६७

वर्ष १८ वें ] जानेवारी–मार्च १९४६ [ अंक ५ वा



अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका

## साभार स्वीकार

### के. भि. ढवळे, मुंबई, यांचीं प्रकाशनें

१ करवंदें— ले० ग. म. वैद्य; मूल्य रु. ।≈.
२ ललाट लामा— ले० चिं. आ. मुंडले; मूल्य रु. १।.
३ शीलाचें मोल— ले० वि. कृ. नेरुरकर; मूल्य रु. १।.
४ दहा धाडसी कुमार— ले० वि. कृ. श्रोत्रिय; मूल्य रु. १॥.
५ शिवाजीचा सिंह— ले० ग. पां. परचुरे; मूल्य रु. १.
६ भाऊबीज— ले० ग. का. रायकर; मूल्य रु. ।·
७ चलो दिल्ली— संपा० का. म. ताम्हनकर; मूल्य रु. ·॥·.
८ सिनेमांतील गोड गाणीं— संपा० ग. का. रायकर व पा. श्री. टिळू; मूल्य रु. ·॥·.
९ माझें घर— ले० काशिनाथ त्रिवेदी; अनु० वामन चोरघडे; मूल्य रु. ।≈.
१० राजाची देणगी— ले० वि. स. गवाणकर; मूल्य रु. ·॥।·.
११ तांबे यांची समग्र कविता— संपा० वा. गो. मायदेव; मूल्य रु. ३॥.
१२ दूरचे दिवे— ले० वि. वि. शिरवाडकर; मूल्य रु. १॥.
१३ ओजस्विनी— ले० राजकवि यशवंत; मूल्य रु. १॥.

[ पुढील मजकूर मलपृष्ठ ३ वर

---





# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका



## पांखरा—

जाति : दयिता

रोजच तूं येउनि बससी
　　हळूच या खिडकींत;
गढून मी गेलों असतों
　　अपुल्या उद्योगांत.

लागतांच अस्तित्वाची
　　तुझिया मृदु चाहूल
मम हृदयीं उल्हासाचे
　　नकळत घुमती सूर !

त्या इवल्या डोळ्यांत तुझ्या
　　अस्फुट, तरल छटांनी
'स्नेह' बसे गुम्फित अपुलों
　　मधुर स्वप्न-कहाणी !—

नीरव भाव तिच्यांतिल तो
　　माझा मज आकळतो;
अनुभूती नव ये कांही
　　जीव मुदें गहिवरतो.

आणिक मग हृदयास मिळे
　　अपूर्व कांहि दिलासा—
उदासता विरते, होती
　　पुलकित अवघ्या आशा !

—नित्यापरि आलास न तूं
　　तर होतें चुकलेंसें
हुरहुर... खन्त, अकारण अन्
　　सुटती दीर्घ उसासे !

स्नेहाची अपुल्या न कळे
　　काय असे ही किमया !
भाव-निबन्धन हें कुठलें !
　　कुठली ही मधु-माया !

—गत जन्मांतिल का अपुली
　　ओळख कांही होती ?
की जवळीक नवी आता
　　पुढल्या जन्मासाठी !

—कृ. ब. निकुम्ब



# गेल्या पंचवीस वर्षांतील महाराष्ट्र साहित्य संमेलनांच्या अध्यक्षांचीं भाषणें आणि त्यांतून अुद्भवणारे साहित्यविषयक प्रश्न

## अुत्तरार्ध

लें० : वु. का. सन्त

संमेलनाध्यक्षांच्या या सर्व भाषणांकडे सिंहावलोकनात्मक दृष्टि फिरविली असतां मराठी वाङ्मयाचें क्षितिज दिवसेंदिवस वाढत व प्रगत होत आहे असें दिसून येत असल्याचा अुल्लेख यापूर्वी आलाच आहे. सामान्यतः त्यांतून कोणकोणत्या गोष्टी आलेल्या आहेत त्यांचें भाषणशः संकलनात्मक निदर्शन पूर्वार्धांत केलेंच आहे. आता त्यांतून विशिष्ट असे साहित्य-विषयक प्रश्न केव्हा नि कोणते अुपस्थित झाले व पुढे त्यांची व्यवस्था (वा वासलात) केव्हा, कशी लागली किंवा अद्यापिहि ते तसेच अनिर्णित राहिले आहेत काय, अेतत्संबंधीचा प्राधान्यें-करून विचार करावयाचा आहे.

येथें अेक गोष्ट न सांगतांहि लक्षांत येअूं शकेल ती ही की, ज्या भाषणांतून कांही विशिष्ट प्रश्न अुपस्थित झालेले असतील तेवढ्यांचाच काय तो विचार येथें होअील. अितर केवळ औपचारिक नि कंठाळी स्वरूपाचीं जीं (भाषणें) असतील तीं सर्व साहजिकपणें वगळावीं लागतील हें अुघड आहे.

**वैद्यांची मराठीच्या अुत्पत्तीची अुपपत्तिः**—कांही तरी विशिष्ट साहित्यविषयक प्रश्न अुपस्थित होण्याच्या दृष्टीने सर्वांत पहिलें चिरस्मरणीय भाषण भारताचार्य चिंतामणराव वैद्य यांचेंच झालेलें आहे. कांटेकोरपणेंच बोलावयाचें म्हणजे वैद्यांच्या भाषणांतून तसा प्रश्न अुपस्थित झालेला नाही हें खरें; तरी पण त्यांतून अेक विचारपरिप्लुत नि अधिकारपूर्ण असें मत निष्पन्न झालेलें आहे ही गोष्टहि तितकीच महत्त्वाची आहे. मराठीची पीठिका, तिचा अुत्पत्तिकाल व तिची घटना या प्रत्येक गोष्टीविषयी स्वतंत्र वेगळीं वेगळीं मतें प्रतिपादिलीं जातात, त्यांपैकी वैद्यांचें जें मत होतें तें प्रथम येथे मांडलें गेलें. त्यांच्या कल्पनेप्रमाणे मराठी ही खि. श. पूर्वी पहिल्या शतकांत अुगम पावली. त्याप्रमाणे, तिच्या पीठिकेविषयी सुद्धा त्यांचें असें स्वतंत्र मत आहे. हा विद्वद्गम्य विषय असल्याने अितरेजनांस त्यांत गोडी वाटणें शक्य नसतें. तरी पण त्या व्याख्यानांतून अुद्भवलेला हा अेक पक्ष आहे व त्या गोष्टीचा पूर्ण निःसंदिग्ध निर्णय पुढे कधीकाळीं होअील तोंवर वैद्यांचें मत म्हणून तो स्वतंत्रपणें ओळखिला जाणार हें अुघड आहे.

**मराठी भाषा जिवन्त असून वाढत आहे!:**—वैद्यांच्या मागून प्रस्तुत दृष्टीने अुल्लेखनीय भाषण म्हणजे हरिभाअू आपटे यांचें होय. त्यांच्या भाषणांतहि वैद्यांच्या भाषणा-

प्रमाणे कोणताहि साहित्यविषयक प्रश्न अुपस्थित झालेला नाही. तथापि 'मराठी भाषा मृत्युपंथास लागली आहे' असा अेक विशेष कोलाहल जो त्या काळीं घरोघर माजविला जात होता, त्याचें प्रभावी खंडन त्यांनी त्यांत करून मराठी साहित्याच्या पुढचा सबंध मार्ग मोकळा केला आहे. आपटे यांच्या त्या भाषणानंतरच्या आजवरच्या सुमारें पाव शतकाधिक कालांत मराठी भाषेला जें अभिमानास्पद सामर्थ्य प्राप्त झालेलें दिसत आहे, त्याच्या योगानेच त्यांचें म्हणणें पूर्ण सिद्ध झालेलें असल्यानें त्यांनी त्या वेळीं आपल्या म्हणण्याच्या पुष्ट्यर्थ दिलेल्या नानाविध प्रमाणांचा नि केलेल्या विधानांचा आता येथे निर्देशहि करण्याचें प्रयोजन राहिलेलें नाही. त्यानंतर पुन्हा १९२७ मध्ये श्रीपाद कृष्णांनीहि आपल्या भाषणांत तसल्याच आक्षेपाचें खंडन थोड्या निराळ्या पद्धतीने केलें आहे. पण तेंसुद्धा अितिहासाचार्य राजवाडे यांच्यासारख्यांनी यापूर्वी नुकताच तद्विषयक निराशावाद वैतागाने पुढे ठेविला होता म्हणूनच. परंतु मूळांतच राजवाडे व कोल्हटकर यांच्या भूमिका परस्परविरोधकांच्या मुळींच नसून तो वाद कोल्हटकरांकडून केवळ विद्वत्समाधानाच्या लालसेनेच आनुषंगिक रीत्या नि खेळीमेळीने हाताळला गेला आहे. यावरून कांही काल अशा प्रकारचा प्रश्न विद्वज्जनांना तरी महत्त्वाचा वाटत होता असें दिसतें.

हरिभाअू आपटे यांनी निरसन करण्याचा प्रयत्न केलेली आणखी अेक छोटी गोष्ट जातां जातां येथे अुल्लेखावीशी वाटते. ती म्हणजे सामान्यतः समकालीन किंवा अर्वाचीन ग्रंथकारांविषयी, लोकांमध्ये बहुधा सर्व काळीं अुपेक्षावृत्ति नि अनादर असतो हा आक्षेप होय. या आक्षेपाचें आपट्यांनंतर १९२१ मध्ये न. चिं. केळकर यांनीहि आपल्या अितर विवेचनांत आनुषंगिकरीत्या बरेंच निरसन केलें आहे. मूळांत आक्षेप अेकच असल्यामुळे दोघांच्या निराकरणात साहजिकपणेंच बरेंच साम्य आहे.

**'सयमकनिर्यमक' वादः**—मराठी काव्याच्या क्षेत्रांत सयमक-निर्यमक वाद अेके काळीं थोडाफार महत्त्व पावला होता. त्याचा पडसाद प्रामुख्याने १९१७ मधील आगाशे यांच्या भाषणांत अुमटला आहे. त्या वादाची चर्चा आगाशे यांनी बरीच विस्ताराने केली. समयक रचनेला आधार केवळ पूर्वीच्या मराठी कवितेंतील अेकजात परंपरेचाच. पण संस्कृत व अिंग्रजी या दोन्हीहि साहित्यांची साक्ष त्याच्या अुलट पडत असल्याने कविता 'समयक'च हवी असें अैकांतिक प्रतिपादन करणें आगाशे यांना शक्य नव्हतें. तथापि रूढ परंपरेच्या आहारीं गेल्यामुळे त्यांनी विस्तृतपणें अूहापोह करूनसुद्धा शेवटीं "विशेष प्रतिभेच्या कवींनेच सयमकतेची रूढि मोडण्याचें धाडस केल्यास चालेल" अशा आशयाचा गुळमुळीतच निर्णय दिला आहे!! त्यानंतर १९२८ मध्ये वस्तुतः अुपर्युक्त वाद त्या वेळीं तितका तीव्र राहिलेला नसतांना सुद्धा माधवरावजी भणे यांनी त्यासंबंधी थोडेंसें विवेचन करून वरीलसारखेंच मत प्रतिपादिलें. अलीकडे 'मुक्तच्छंदा'ची प्रथा नवीनच विचारांत येत असल्याने व स्वतःहि त्या धर्तीवर 'वैनायक' हें नवीन वृत्त प्रचलित केलेलें असल्यामुळे सावरकरांनीहि 'सयमक-निर्यमक-वादा'चा अुल्लेख केला. पण तो केवळ आनुषंगिकच असून त्यांनी तो प्रश्न स्पष्टपणें तिय्यम महत्त्वाचाच म्हणून लेखिला आहे.

**'सहेतुक-अहेतुक' वाङ्मयः**—पण सयमक-निर्यमकाचा वाद हा किती झाला तरी कवितेच्या बाह्यांगीण स्वरूपाविषयीचाच होता; तिच्या अंतःस्वरूपाशीं भिडणारे असेहि कित्येक प्रश्न विवेचनाची वाट पाहत होतेच. तशा कांही प्रश्नांचा स्वतंत्र मूलगामी असा विचार प्रथम न. चिं. केळकर यांच्याच भाषणांत प्राधान्याने केलेला आढळतो. अर्वाचीन

मराठी काव्याच्या स्वरूपासंबंधाचें त्यांचें सर्व विवेचन अगदी नवीनच होतें; पण तें वास्तव असल्याने विवाद्यतेचा प्रश्नच तेथे फारसा अुद्भवूं शकला नाही. परंतु काव्यशास्त्रदृष्ट्या दोन मोठ्या तात्त्विक प्रमेयांचा जो त्यांनी अुपन्यास केला तोच खरा वैशिष्ट्यपूर्ण होता. ‘ललित-वाङ्मयामागे हेतुसंशोधना’चा गुप्त पोलिस नको हें मत प्रतिपादून ‘कलेसाठी कला’ या त्या-नंतर पुष्कळच गाजलेल्या वादाचा त्यांनीच मूळ पाया घातला म्हटलें तरी चालेल. परंतु त्या संबंधांत स्वतः अशा प्रकारें प्रवर्तक असूनहि पुढे त्यांचेंच जें मतपरिवर्तन झालें तें लपवि-ण्याचाहि प्रा. फडके यांच्यासारखा आग्रही प्रयत्न त्यांनी कधीच केलेला नाही. पण त्यामुळे तो वाद मात्र मुळांतच दुबळा असल्याचें आयतेंच सिद्ध झालें. वास्तविक हा वाद मराठींत पुष्कळ दिवसपर्यंत महत्त्व पावला होता, व ज्याप्रमाणे अलीकडे प्रत्येक सन्मान्य वा विचारशील साहित्यिकाला ‘पुरोगामी वाङ्मया’ची, त्याच्या व्याख्येची वा तत्संबंधी अितर चर्चा करावीशी वाटते, त्याप्रमाणे कांही कालपर्यंत प्रत्येक नामवंत साहित्यिकाला या वादांतील आपापला पक्ष वेळोवेळीं प्रकट करण्याची जरूरी वाटत असे. परंतु समाजपरिस्थितीचे रंग इतक्या लवकर बदलत आहेत की नवीन जिवन्त नि जिव्हाळ्याच्या प्रश्नांपुढे हा प्रश्न जवळ जवळ सध्यातरी विरोधीपक्षाचे बाजूने निकालांतच निघाल्यासारखा दिसतो. १९२० पुढील अध्यक्षीय भाषणांत याचा अुल्लेख मात्र कोणीं विशेष केलेला दिसत नाही. याचें कारण तो प्रश्न जिवंत असेपर्यंतच्या काळांतील बहुतेक अध्यक्ष जुन्या पिढींत मोडण्यासारखे आणि पुढे ज्या वेळीं नवीन विचारांच्या पिढीला या पदाचा मान मिळूं लागला त्या वेळीं तिच्यापुढे अितर महत्त्वाचे प्रश्न होते नि प्रस्तुत प्रश्नाची वर अुल्लेखिल्याप्रमाणे वासलात लागली होती. आजहि क्वचित् अेखादा साहित्यिक ह्या निकालांत निघालेल्या प्रश्नावर आपले विचार प्रकट करून शिळ्या कढीस अूत आणण्याचा प्रयत्न करतांना आढळतो !

**‘सविकल्प समाधी’ची अुपपत्तिः**—केळकरांनी अुपस्थित केलेला दुसरा महत्त्वाचा प्रश्न म्हणजे काव्यानंदाविषयीचा. तेथे त्यांनी आपली ‘सविकल्प समाधी’ची स्वतंत्र नि अभिनव कल्पना मांडली. अेक विचारणीय अुपपत्ति म्हणून त्या शास्त्रांतील तज्ज्ञांनीहि विशेष मान देण्यासारखी ती कल्पना होती. पुढे १९३० मधील अध्यक्षीय भाषणांत प्रा. वा. म. जोशी यांनी त्या कल्पनेवर ज्या शंका घेतल्या आहेत त्यावरून केळकरांचें त्या संबंधांतलें म्हणणें हें शेवटचें वा निर्णायक नव्हे हें स्पष्ट झालें. परंतु तरीहि ‘सत्या’च्या विविध पैलूंपैकी अेक त्यांनी अुजळून पुढे ठेविला हें निरपवादच होय.

**‘करुणरसानन्द नि कॅथार्सिस’**:—वाङ्मयासंबंधीची अशीच मूलगामी तात्त्विक चर्चा करणारें दुसरें व्याख्यान प्रा. वा. म. जोशी यांचें झालें. त्यांनी वाङ्मयाचें स्वरूप बोधपूर्व व अबोधपूर्व असें द्विविध कल्पिलें आहे. तसेंच वाङ्मयाचें ध्येय जरी आनंद हेंच असलें तरी तो सत्य, सौजन्य व सौंदर्य यांच्या अस्तित्वाने निर्माण झालेला असावा हें त्यांच्या नांवावर अधिकृत म्हणून मान्य असलेलें मत मांडलें. मराठींत या शास्त्राची चर्चा पुष्कळच झाली आहे. दुसरा प्रश्न त्यांनी जो चर्चिला तो म्हणजे ‘करुणरसापासून आनंद कां होतो’ हा होय. या संबंधांत पूर्वकालींहि पुष्कळ अुपपत्ति पुढे आलेल्या असून त्यांतलें ॲरिस्टॉटल्चें कॅथार्सिसचें तत्त्व त्यांना मान्य असल्याचें त्यांनी बऱ्याच विस्ताराने पटवून दिलें आहे. त्यांतहि कॅथार्सिस या शब्दापासून निष्पन्न होणाऱ्या अर्थाविषयींचें त्यांचें स्पष्टीकरण नावीन्यपर मार्मिक नि कौतुकास्पद असें आहे. अर्थात् त्यासंबंधांतहि पुष्कळच शंका विचारतां येतील; फार काय, करुणरसापासून आनंद होतोच की काय हा मूळांत अेक प्रश्न आहे!—म्हणजे,

जी अनुकूल सुखसंवेदना होते तिच्या स्वरूपाविषयीहि पुष्कळ विवाद्य खलवत करतां येईल. पण तें कांहीं असलें तरी जोशी यांच्या विवेचनाचें महत्त्व त्यायोगें रतिमात्रहि अल्प होत नाही.

काव्याच्या बाबतींत शिवरामपंत परांजपे व ना. गो. चापेकर यांनी पण चर्चा केली आहे. परंतु त्यांनी त्यांत कोणतेंहि मत अट्टाहासाने मांडलेलें नाही. परांजप्यांनी रससंख्ये-विषयी थोडें विवेचन करून संस्कृत शास्त्राच्या आधाराने आजवरच्या रूढ रसव्यवस्थेंत पालट करतां येणें शक्य आहे असें प्रतिपादिलें आहे. चापेकरांचें विवेचन सामान्य स्वरूपाचें आहे. या प्रकारच्या अवलोकनावरून मराठी भाषा काव्य, रस, लालित्य अि.चें शास्त्रीय विवेचन करण्यास बरीच लवचिक झाली आहे; व लेखकांच्या परिणत प्रज्ञेमुळे तिच्यांत साहित्यविषयक स्वतंत्र नवीन मतें व संप्रदाय निर्माण होतील अशी आशा करावयास पुष्कळ वाव आहे.

काव्यनाटकादि ललितकलांवर अशा प्रकारचें पांडित्यपूर्ण प्रवचन अलीकडील अध्यक्षां-च्या भाषणांतून आढळत नाही. त्यामुळे अेका विशिष्ट विचारसरणीचे लोक त्यांची मौलिकता कमी लेखण्याचा प्रयत्न करतात. परंतु हीं विवेचनें मराठीच्या अलंकरणाच्या दृष्टीने महत्-त्वाचीं असल्याने आजच्या समाजक्रांतीच्या दिवसांत त्या प्रश्नांना जिवंतपणा लाभेल असें वाटत नाही, व या प्रश्नांवर विचार करणें वा लेखन करणें हा समाजविन्मुख विद्वत्तेचा भाग समजला जातो. आणि म्हणून हे प्रश्न येथून पुढे कांही कालपर्यंत तरी थोड्याशा विद्वानांपुरतेच व तद्विषयीच्या अभ्यासकांपुरतेच मर्यादित राहणार हें अुघड आहे.

**' राजसंस्था नि साहित्य ':—** डॉ. केतकरांच्या भाषणास वेगळें स्वतंत्र असें स्थान द्यावें लागेल. त्यांनी विशिष्ट प्रकारचे प्रश्न विचारांत घेतले वा निर्माण केले नाहीत. तरी पण त्यांच्या विचाराचें अधिष्ठान अर्वाचीन साहित्यविषयक चळवळींना आहे असें म्हणण्यास प्रत्यवाय नाही. आणि त्यांच्या विवेचनामुळे कित्येक जीर्णमतवादींस तें भाषण कदाचित् साहित्यविषयक आहे असें वाटणारहि नाही. त्यांनी राजकीय सत्तेच्या अभावीं साहित्याची प्रगति होअूं शकेल काय हा अेक नित्याचाच विचार करण्याजोगा प्रश्न निर्माण करून ठेविला आहे. राजकीय वा सांस्कृतिक विचारांचा आज जो विकास झाला आहे त्यामुळे राजकीय व सांस्कृतिक प्रश्नांची अेकरूपता आज समाजास पटलेली आहे.

**अेक गौण तात्त्विक प्रश्न:—** खाडिलकरांचें भाषण बहुतांशीं तत्त्वप्रधान नि विद्वता-प्रचुर असें झालें. त्यांनी ज्ञानेश्वरी नि गीतारहस्य यांचें जें साम्य त्यांत दर्शविलें आहे तें स्वतंत्र ग्रंथनिविष्टतेने पुढे आलेलें नाही. म्हणून तें त्या दोन ग्रंथांच्या लेखकांविषयी त्यांना वाटणाऱ्या अभिमानाचेंच केवळ द्योतक आहे की तत्त्वदृष्ट्या खरोखर अेक प्रकारचें साम्य दोहोंत आहेच, हें समजणें बरेंच कठिण आहे. पण त्यांत पहिलीच शक्यता अधिक वाटते. तसेंच हें विवेचन साहित्याच्या प्रांतांत कितपत पडेल हाहि अेक प्रश्नच आहे.

**नवमतवाद्यांवरील आक्षेप:—** ना. गो. चापेकरांनी नवमतवाद्यांवर त्यांचे विचार अुसने असतात असा अेक आक्षेप जातां जातां केला आहे. हा आक्षेप आपल्यांचे वेळींहि घेतला जात होता. औंधकरांनी मात्र नवमतवाद्यांचा कैवार घेतला आहे तो बहुधा 'किर्लोस्कर' मासिक ही त्या वादाची प्रमुख पुरस्कर्ती संस्था त्यांच्या राज्यांत नांदत नि भरभराटत असल्यामुळेच की काय न कळे! बाहेरच्या वातावरणांत हा प्रश्न अेकेकाळीं बराच गाजत होता आणि आजहि नवनवीन विचारांचा ते केवळ परदेशीय म्हणून अुपहास केला जातो.

ह्या परंपरेचीं बीजें अव्वल अिंग्रजींतील आगरकरादि पहिल्या सुधारकांपर्यंत जाअून पोंचतात. आणि स्वतंत्र हिंदुस्थानची स्वतःची वैचारिक वा सांस्कृतिक परंपरा वा तद्विषयक मूल्यें निर्माण होअीपर्यंत अशा प्रकारच्या आक्षेपकांचा वर्ग अखंड राहणारच व त्या विरोधाला कधी कधी महत्त्वहि प्राप्त होणार.

**'भाषाशुद्धी'चा प्रश्नः**–त्यापुढचें (म्हणजे १९३६मधलें) माधवराव पटवर्धन यांचें भाषण अथपासून अितीपर्यंत केवळ भाषाशुद्धीचा अेकमेव पुरस्कार करणारें होतें. पूर्वी सावरकरांनी स्वतंत्र चळवळीने त्या वादाला जी चालना दिली होती तिच्याच पटवर्धन हे निष्ठावन्त पाअीक बनलेले होते. कोल्हटकर व परांजपे यांनी त्या प्रश्नाची आपापल्या भाषणांतून चर्चा केली, तथापि त्याचें खरें अंतरंगच त्यांना आकलन झालें नसल्यामुळे त्यांची चर्चा केवळ विरोधापलीकडे फारशी पोंहोचली नाही. पण पटवर्धन-सावरकरांची गोष्ट त्याच्या अगदी अुलट होती. ते दोघे त्या मताचे प्रवर्तक नि पुरस्कर्ते असल्याने त्यांस आवश्यक असणारा योग्य तो अभिनिवेश नि आत्मविश्वास त्यांच्या ठायीं होता. त्या सर्वांचें अिंग्रजी शब्द जसेच्या तसे सहसा घेअूं नयेत या बाबतींत अेकमत आहे. आपटे मात्र धंद्यांसंबंधीचे शब्द घ्यावेत असा सल्ला देतात व फारशी जशी पचविली तशी अिंग्रजी पण पचविली पाहिजे असें प्रतिपादितात. कोल्हटकरांनी जो या विषयाचा विचार केला तो राजवाड्यांच्या आक्षेपाचें ह्या मुद्यावर अधिष्ठान होतें म्हणून. तरी पण ते अिंग्रजी शब्द अुगाच वापरण्याच्या प्रवृत्तीचा निषेध करतात. परंतु तसें होणें ( शब्द-घेणें ) अपरिहार्य आहे कारण नवीन कल्पना, वस्तु यांबरोबर शब्द नवीन येणारच. फारशी शब्दांना योग्य ( मराठी ) पर्याय सांपडत नाहींत अशा शब्दांची यादी त्यांनी ( कोल्हटकरांनी ) दिली आहे, व ज्याअर्थी हे शब्द मराठीचे नियम पाळतात त्याअर्थी ह्यांस मज्जाव नसावा असा त्यांच्या विवेचनाचा रोख आहे. परांजप्यांनी मुद्दा असें मत दिलें, परंतु अेखाद्या राष्ट्राच्या लोकांस अेखाद्या राष्ट्राच्या भाषेविषयी तिरस्कार वाटत असल्यास त्यांनी त्या शब्दांवर बहिष्कार टाकला तर तें योग्य आहे असें आयर्लंडचें अुदाहरण देअून पटविलें.

पटवर्धन-सावरकरांना या बाबतींत हलगर्जीपणा, ढिलाअी, दास्यवृत्ति दिसते, आणि ही अुपेक्षावृत्ति घालविण्याची तळमळ त्यांना लागून राहिली आहे. या चळवळीने मराठी भाषेची 'सर्गशक्ति' वाढविली व क्षुल्लक गोष्टींतहि जागरूकता असणें किती आवश्यक आहे हें पटवून दिलें. दुसरा चांगला परिणाम म्हणजे मराठींत बोलत वा लिहीत असतांना अिंग्रजी शब्दांना मराठी पर्याय न सुचणें ही कमीपणाची गोष्ट समजली जाते ही होय. या भाषाशुद्धीवाल्यांस कोणी विरोध करूं शकत नाही व करूं नयेहि. त्यांच्या प्रयत्नाने मराठी भाषेची सर्गशक्ति खात्रीने वाढण्यास व तिचें सामर्थ्य वर्धमान होण्यास साहाय्यच होणार आहे. कारण, शब्दांसाठी आता जुन्या वाङ्मयाकडे वळावें लागतें व त्यांतील शब्द वापरल्यास विद्वेषी वृत्तीचा आक्षेप कोठे येतो ! जवाहरलालजींनी हिंदी-अुर्दू वादांत हीच भूमिका घेतली आहे. ते म्हणतात, संस्कृतनिष्ठ हिंदी नि फारशीनिष्ठ अुर्दू हे दोन्ही पंथ वाढूं द्या. त्याने भाषा समर्थ होअील. मग जेव्हा त्या विद्वानांना आपण कोणासाठी लिहीत आहोंत याची जाणीव होअील त्यावेळीं आपोआपच शब्दाचें जडजंजाल बाजूस ठेवून लोकांच्या भाषेंत लिहावें लागेल. तीच भूमिका येथेहि घ्यावयास हरकत नाही. नवीन पिढींतला मराठी लेखक दोन्ही शब्द वापरण्यास पूर्णपणें मोकळा आहे. तो 'कबूल'प्रमाणे 'मान्य' शब्दहि योजील, आणि 'खर्च' शब्दाबरोबर 'व्यय' शब्दहि त्याला आठवेल; ति 'अत्तर' लावतां लावतां 'फुलेल' शब्दाची गोडी याला आवडेल; आजहि या जाणिवेने जो बारकाअीने पाहील त्यास हें स्पष्टपणें कळावयास

लागेल की, 'जपान तुमच्या पवित्र क्षेत्रांचीं नांवें बदलील' असे मोडक्या मनोऱ्याच्या जाहिराती देणारांनी 'मुंबअी'चें नांव पद्धतशीर 'व्हिक्टोरिया' करण्याचा प्रयत्न चालविला आहे, असें आगगाड्यांवरील नवीन फलक पाहतांहि दिसून येअील !

भाषाशुद्धीची चळवळ आज अैतिहासिक चळवळींत जमा करावी लागेल, व म्हणूनच तिची फलश्रुति वर दिलेली आहे. किंबहुना सावरकरांच्या १९३८ मधील भाषणांत त्यांनी दिलेल्या आचरणात्मक सूत्रांवरूनहि तेंच दिसून येतें. आर्थिक प्रश्नांपुढे सांस्कृतिक प्रश्नांना गौणत्व प्राप्त होत असलें तरी त्या बाबतींतली जागरूकता राष्ट्राच्या सर्वांगीण विकासास नुसती अुपकारकच नव्हे तर अत्यंक आवश्यक ठरते.

**'लिपिशुद्धि':**— बॅ. सावरकरांनी ज्या साहित्यविषयक चळवळींना चालना दिली त्यांपैकी अेक लिपिशुद्धीची चळवळ होय. हा प्रश्न साहित्यापेक्षा मुद्रणाशीं जास्त निगडित झालेला आहे, आणि लिपिसुधारणेची आवश्यकता पटून सोलापूर अधिवेशनांत लिपिसुधारणा समिति नेमिली जाअून तिने कांही महत्त्वाचे निर्णय घेअून त्यांस संमेलनाची संमति पण मिळाली आहे. वास्तविक पाहतां लिपीला सांस्कृतिक व पारंपरिक महत्त्व असतें व म्हणून ती बदलण्याची वेळ सहसा येअूं नये. जपानचें अेक अुदाहरण असें देतां येतें की, त्या राष्ट्राने आपली लिपि न बदलतां यांत्रिक सुधारणेने ती मुद्रणसुकर अशी बनविली. जपानची लिपि ही चित्रलिपि असल्याने ती देवनागरीपेक्षा किती तरी अवघड, परंतु तीसुद्धा जपानने बदलली नाही. असें असलें तरी मूळची सुकर नागरी लिपि थोड्या सुधारणांमुळे जास्त सुकर झाली तर त्या करण्यास प्रत्यवाय नसावा. अेकदा ही भूमिका अंगीकारिली तर नागरी लिपि अिंग्रजीअितक्याच सुलभतेने ('मोनोटाअीप'वर ती बसलेलीच आहे, पण) टंकयंत्रावर (टाअिपरायटर) बसलेली आढळून येअील. आणि हें सर्व झाल्यावर व मराठी लेखक मराठी टंकयंत्रें वापरूं लागल्यावर तिचें जें विशाल नि व्यापक स्वरूप होअील तें विलोभनीय वाटेल ! युद्धानंतर अल्पावधींत कदाचित् या प्रश्नांना दृश्य स्वरूप आलेलें आढळेल नि अेका दृष्टीने हा प्रश्न तूर्त तरी निकालांत निघाल्यासारखा होअील.

**'राष्ट्रलिपी':**— लिपीच्या प्रश्नांत राष्ट्रलिपीचा पण समावेश व्हावयास हरकत नाही. परांजप्यांनी 'देवनागरी'ला भारतीय स्वरूप दिल्यास बरें होअील असें सुचविलें. आणखीहि अणे-चापेकरांसारख्यांनी या प्रश्नाचा ओझरता अूहापोह केला आहे. सावरकरांनी अट्टाहासाने देवनागरी हीच 'राष्ट्रलिपी' झाली पाहिजे असें सांगून तिच्या पुष्ट्यर्थ शास्त्रशुद्धतेचीं जीं गमकें दिलीं आहेत तीं बिनतोड आहेत. रोमन लिपीची हजेरी सावरकरांनी योग्य घेतली. त्यांनी रोमन लिपीचें अपूर्णत्व पूर्णपणें नजरेस आणलें. खरोखर मराठी (संस्कृत, हिंदी अि.) भाषा रोमन लिपीवर बसवावयाची म्हटली तर त्या लिपींत कितीतरी सुधारणा कराव्या लागतील. अितकेंहि करून लिपीमागील संकेत दुसऱ्या लिपींत अुतरणें अशक्य आहे ! 'दलित' हा शब्द रोमन लिपींत Dalita असा लिहिला तर त्यामागील दृश्य संकेत लोप पावल्याने तो वाचल्यास अर्थाबद्दल विचार करावा लागेल; आणि अुच्चाराचे बाबतींत तर रोमन लिपी अितकी दुबळी आहे की, तोच शब्द ६४ प्रकारें मराठींत अुच्चारितां येअील. आमचीच लिपी जर यंत्रसिद्ध झाली, तर ती सौंदर्य सुकरता नि शास्त्रशुद्धता या बाबतींत जगांतील कोणत्याहि लिपीस हार जाणार नाही—नव्हे खरोखर कधी काळीं जगाचें अेक संघराज्य 'Federation' अस्तित्वांत आलें तर आणि विश्वलिपीचा प्रश्न निघाला तर हीच लिपी त्या मानास योग्य ठरेल !

**किरकोळ नि गौण प्रश्नांचा परामर्श : ग्रंथ-निर्मिति-योजना:**—मराठी भाषेच्या

वर्धनाच्या दृष्टीने ज्या निरनिराळ्या योजना पुढे आलेल्या आहेत त्यांमध्ये ग्रंथनिर्मिति वाढण्यासाठी 'ॲकॅडमी'वजा कल्पना पुष्कळांनी सुचविल्या आहेत, त्यांत आगाशांनी अेका फ्रेंच संस्थेचें अुदाहरण वर्णन केलें. पण त्याला काल्पनिकच स्थान बरेंच द्यावें लागेल. कारण व्यवहारदृष्ट्या कांहींच सुचविलें वा योजिलें गेलें नाहीं. किब्यांनी योजनेला जास्त वास्तव स्वरूप दिलें परंतु तिचीहि पण वासलात तीच लावितां येअील. सयाजीरावांनी जातां जातां या कल्पनेचा पुनरुच्चार केला आहे.

यावरून असें दिसून येतें की, या कल्पना या नुसत्या कल्पना म्हणूनच त्यांनी सुचविल्या. त्या प्रत्यक्ष अस्तित्वांत अुतरविण्याची आवश्यकता कोणासच भासलेली दिसत नाही. प्रो. फड़के, पोतदार यांनी आधुनिक कालानुसार वाचक, लेखक अित्यादि लोकांची अेक प्रभावी संघटना असावी असें प्रतिपादिलें आहे. अर्थात् त्यांचा प्रत्यक्ष अवतार झाला किंवा नाही याबाबत आज कांहीच लिहितां येत नाही.

**ग्रंथांवरील टीकाः**—ग्रंथावरील टीकेबाबतहि तेंच. ग्रंथसमीक्षण होणें व तें निःस्पृहतेने होणें वाङ्मयवृद्धीस हितावह आहे याबाबत कोणाचेंहि दुमत होणें शक्य नाही. परंतु तें मराठींत सचोटीने होत नाही असें पण कांही म्हणतात. या विषयावर कोल्हटकर, परांजपे, डॉ. केतकर यांनी लिहिलें आहे. 'केतकरांच्या वाङ्मयआढावा समीती'चा पण येथेच अुल्लेख हवा. पूर्वीच सरकारकडून अशा प्रकारचें अधिकृत परीक्षण होत असे; तें परत व्हावें असा पण सल्ला कांहींनी दिला आहे. प्रा. फडक्यांनी या प्रश्नाचा विचार करणारी मध्यवर्ती अधिकृत संस्था असावी असें मत मांडिलें आहे. अर्थात् हा प्रश्न विवाद्य होअूं शकत नाही, व 'म. सा. पत्रिकें'त या दृष्टीने परीक्षणें सडेतोड, निर्भीड येतहि असतात. आणखी प्रयत्न या दृष्टीने (दिशेने) होत आहेत, पण ते मामुली स्वरूपाचे.

**'मराठी नि विद्यापीठ':**—संवर्धनाचे दृष्टीने यापेक्षा महत्त्वाचा प्रश्न म्हणजे मराठीचा विद्यालयांत प्रवेश होण्यासंबंधीचा, व शेवटीं स्वतंत्र विद्यापीठाचा. हे दोनही भाग आज विवाद्य स्वरूपाचे नाहीत. मुंबअी विश्वविद्यालयांत आज महाविद्यालयांत अेक विषय म्हणून तरी स्थान मिळालें आहे ( सर्व वर्षांत ). अर्थात् विद्यापीठाची बोधभाषा होणें ही गोष्ट स्वतंत्र महाराष्ट्र-विद्यापीठ अस्तित्वांत आलें तरच होणार आहे. स्वतंत्र विद्यापीठाचे प्रयत्न पुष्कळ अंशीं फलद्रूप होतील अशी आशा आहे. कारण सरकारने समिति नेमली आहे. या विषयाचा पुरस्कार प्रा. पोतदारांनी अट्टाहासानें करणें अपरिहार्य आहे. तसेंच सयाजीरावांच्या भाषणांत तर त्यांनी कार्यप्रणालीच आंखून दिली आहे. सावरकर, खाडिलकर यांनीहि या गोष्टीचा आपल्या भाषणांतून पुरस्कार केला आहे.

रा. ब. चापेकरांनी मात्र जरा वेगळ्या प्रकारचे विचार प्रदर्शित केले आहेत. आज अशा प्रकारचे विचार त्यांचे आहेत की बदललेले आहेत हा प्रश्नच येथे अुत्पन्न होअूं शकत नाही. महाराष्ट्र-विद्यापीठाचें ध्येय वा कार्यकक्षा ही मुंबअी विद्यापीठाप्रमाणे नसून ती 'प्रसर्जक' व 'प्रसारक' अशी दोन्ही प्रकारची असणार. रावबहादुरांना वाअीट वाटतें तें विद्वत्तेचा दर्जा कमी होअील याचें ! कारण आजच्या विद्यापीठांतून अुत्तम विद्वानहि होत नाहीत व अुत्तम नौकरहि होत नाहीत. पण या बाबतींत (विद्वत्तेच्या) निराश होण्याचें कारण नाही. नोकरीचा प्रश्न सामाजिक आहे; तो या कक्षेबाहेर पडतो असें जरी असलें तरी बडोद्यासारख्या संस्थानाने हा प्रयोग करून पाहण्याचा सल्ला त्यांनी दिला आहे !

त्याहीपेक्षा विद्यापीठाच्या अंगणांत मराठी जो हुतूतूचा खेळ खेळली तो मजेचा आहे.

मनुष्याचे विचार किती पुरोगामी व किती प्रतिगामी असूं शकतात याचें प्रत्यंतर येथे मिळतें. प्रथमच्या अध्यक्षांचा या प्रश्नावर बराच जोर असे; कारण ते सारे सरकारी नोकर असल्याने व अर्जे-विनंत्यांच्या सामर्थ्यावर त्यांचा पूर्ण विश्वास असल्याने तशी वस्तुस्थिति असणें अपरिहार्य होतें. कोल्हटकरांच्या भाषणांतील 'परस्परावलंबी कोड्या'चा अुल्लेख वर आलाच आहे. आगाशांचे विचार मात्र या बाबतीत अगदी प्रतिगामी आहेत. न्यायमूर्तींसारखे प्रयत्न आपल्याकडून होणें शक्य नाही असें त्यांनी पर्यायाने सुचविलें आहे. अेवढ्यावरच ते थांबले नाहीत, तर त्यांनी वर अेका ठिकाणीं निर्दिष्ट केलेला भाषांतराचा सल्ला दिला आहे. तीच गोष्ट बाल-पुस्तकांबाबत. स्वतःचें कृतिदौर्बल्य दडविणारें वा त्याला पुष्टि देणारें हें प्रतिगामित्व पाहिलें की आज अेक प्रकारची मौज वाटते. कुठे न्या. मू. रानडे आणि कुठे असे कृतकृत्यतेचा गंज चढलेले लोक!! किंग्यांनी या प्रश्नाचा अुल्लेख केला तो अितर विद्यापीठांनी (महाराष्ट्राबाहेरील) मराठीला स्थान दिल्याबद्दल केला. खाडिलकरांच्या पण भाषणांत असा ओझरता अुल्लेख आढळतो.

**'शुद्धलेखननिर्णय':—** शुद्धलेखनवादाविषयी अेवढेंच म्हटलें पाहिजे की, या भाषणांतून जरी तसा अुल्लेख आला असला तरी त्याची सोपपत्तिक नि शास्त्रीय चर्चा हा विषय सामान्य बुद्धीच्या माणसाच्या आकलनकक्षेच्या बाहेरचा असल्याने, ज्यांनी अुल्लेख आणला त्यांनी अेक समिति नेमावी असेंच सुचविलें आहे. आज समितीचा निर्णय प्रचारांत येअूनहि कांही वर्षे लोटलीं. तरी पण मुंबअीसारखी युनिव्हर्सिटी या गोष्टीस मान्यता देअूं शकत नाही. रा. सा. चापेकर म्हणतात त्याप्रमाणे शुद्धलेखनास सांस्कृतिक महत्त्व आहे, व या बाबतीत ढिलाअी अुपयोगीची नाही. तूर्त कांही काल तरी तो प्रश्न निकालांत निघालेला आहे. (! सं.)

**फडके नि खांडेकरः—** अगदी अलीकडे झालेल्या प्रा. फडके व खांडेकर यांच्या भाषणांकडे मात्र जरा वेगळ्या दृष्टीने पाहावें लागेल. अुपर्युक्त वाग्भट आधुनिक विचारांशीं पूर्णपणें सहमत आहेत असें नव्हे. त्यांना मिळालेली लोकप्रियता आजपर्यंतच्या अध्यक्षांपैकी कितीकांना लाभली असा प्रश्न अुरतो; किंबहुना त्यांना हें पद मिळण्याचें कारण हें लोकप्रियतेचें दडपणसुद्धा असूं शकेल. दोघांचीहि दृष्टि पूर्णपणें समाजाभिमुख असल्याने मराठी साहित्य कार्यक्षम कसें होअील याची चिकित्सा करणारीं भाषणें दोघांनी पण केलीं. केळकर–जोशांप्रमाणे भाषणांत साहित्यविषयक चर्चा नसल्याने त्यांना मौलिक गौणत्व देण्याच्या प्रवृत्तीचा अुल्लेख वर अेका ठिकाणीं आला आहे. वस्तुस्थिति अशी आहे की, वरीलप्रमाणे शुद्ध तात्त्विक चर्चा करण्यास लागणारी विद्वत्ता, व्यासंग अि. सगळ्या गोष्टी त्यांच्या ठायीं असतांहि रस, काव्य अि.च्या चर्चेच्या विवेचनाचे कुंचले हातीं न घेतां प्रचलित साहित्यांतील दोषांचें निराकरण करण्यासाठी टीकेची छिन्नी त्यांनी हातांत धरली आहे. त्यांनी अुल्लेखिलेल्या प्रश्नांचा येथे विचार करावयाचा आहे. मात्र हे प्रश्न जिवंत स्वरूपाचे असल्याने ते अद्याप निकालांत निघालेले नसणार, आणि अर्थात् त्यांचेविषयी कांही विशेष निर्णायक स्वरूपाचें लिहितां येअील असें नाही.

**वृत्तपत्रांवरील आक्षेप—** प्रो. फडक्यांच्या भाषणाचा आशय मागे आलेलाच आहे. मराठी साहित्य कृतिक्षम नि प्रभावी होण्यास त्यांतील वृत्तपत्रवाङ्मय अधिक सकस हवें असा त्यांच्या म्हणण्याचा मथितार्थ आहे, व तो अर्थातच विवाद्य स्वरूपाचा नाही. त्यांनी मराठी वृत्तपत्रांवर अभिरुचिहीनतेचा नि ध्येयशून्यतेचा आक्षेप घेतला आहे. वास्तविक या

बाबतींत अितकी अुलटसुलट चर्चा झालेली आहे की व ती अितकी ताजी आहे की, तिचा अुल्लेख येथे करण्याची आवश्यकता नाही. वरीलपैकी ध्येयशून्यतेचा आक्षेप हा मूळांतच विशेष विचारशीलतेचा निदर्शक नव्हता. टिळकांचें अुदाहरण दिलें तें जरा अयोग्यच होतें; कारण टिळकांचें काय अगर गांधींचें काय, त्यांच्या पत्रांना वृत्तपत्र म्हणून महत्त्व नसून मतपत्र म्हणून महत्त्व होतें. आणि मराठी वृत्तपत्रांनी लोकजागृतीचें कार्य केलेलें नसलें, तरी झालेल्या थोड्याबहुत जागृतींत नाट्य, कादंबऱ्या वा कथा यांचा भागच पुष्कळसा होता हें आजतरी म्हणतां येत नाही. त्यांच्या सर्व आक्षेपांस त्या वेळीं 'नवयुग'ने 'वृत्तपत्रां'ची कैफियत मांडली होती, त्यांत अत्यंत समर्पकतेने अुत्तर दिलें होतें व त्याची ग्राह्यता त्यांनाहि बऱ्याच अंशीं स्वीकार्य वाटली होती.

**अितर आणखी योजनाः**—पण त्यांचा मुख्य रोख अभिरुचिहीनतेवर होता. वृत्तपत्रांवर नियंत्रण घालण्यासाठी, त्यांनी संघटनेची योजना पुढें मांडली होती. नवनवीन लेखकांस अुत्तेजन देण्यासाठी, कसोटीने व सचोटीने ग्रंथपरीक्षण होण्याची आवश्यकता त्यांनी पण प्रतिपादिली. त्याचप्रमाणे वृत्तपत्रविषयक शिक्षण मिळण्यासाठी वर्गाचीहि पण कल्पना त्यांनी सुचविली. ह्यांनी स्वतः धडा घालून देण्यासाठीं वृत्तपत्रव्यवसायांतसुद्धा प्रवेश केला व वरील दृष्टीने आणखीहि प्रयत्न चालविले; या सर्व अितिहासाच्या पानांची शाअीहि अद्याप वाळली नसल्याने अेकदम निर्णयात्मक विधान आज करतां येत नाही, व त्यांना टीकायोग्य वाटलेली परिस्थिती आज सुधारली आहे की काय हा प्रश्नच आहे !

**राजसंस्था नि वृत्तपत्रेंः**—वस्तुस्थिति अशी आहे की, वृत्तपत्रव्यवसायावर सरकारचा डोळा असल्याने व त्या संस्थेचें भवितव्य ठरविणें सरकारच्या हातांत असल्याने जोंपर्यंत सरकारकडून अिकडील वृत्तपत्रसंस्थेस प्रोत्साहन मिळत नाही, तोंपर्यंत खाजगी प्रकारच्या प्रयत्नांना विशेष यश येअील असें वाटत नाही. अभिरुचिहीनतेविरुद्ध सरकार जितके निर्बन्ध घालील तितके अितर कोणीहि घालूं शकत नाही. आज वृत्तपत्रें काय भयंकर परचक्रांत सांपडलीं आहेत व त्यांच्यापुढे कोणता मोठा प्रश्न अुभा आहे हें तद्व्यवसायी लोकच जाणतात. अेका दृष्टीने मराठीवर आजपर्यंत आलें नव्हतें अितकें मोठें गंडांतर आज आलें आहे असें म्हणावें लागेल. फडक्यांच्या भाषणांतील वर अितर अुल्लेखिलेले प्रश्न वा योजना अशाच प्रकारच्या परिस्थितीच्या कुंडांत भिजत पडल्या आहेत. पन्नास वर्षें कार्य करून केलेल्या संघटनेची शक्ति अपुरी पडावयास लागली, तेथे कालआजच्या या 'निरुपद्रवी' साहित्यिकांच्या संघटनेची काय थासलात लागणार !

**खांडेकर नि आजचें ललितवाङ्मयः**—खांडेकरांचें भाषण अेका दृष्टीने या पंचवीस भाषणांतहि अपूर्व आहे. फडक्यांप्रमाणे त्यांनीहि संबंध भाषणभर दोषांची चिकित्साच केली आहे. परंतु अितक्या अुच भूमिकेवरून निःस्पृहतेने ती केलेली आहे की त्या वा अितरहि गुणांमुळे खांडेकरांचें भाषण कितीतरी वाचनीय झालेलें आहे. विशेष म्हणजे त्यांचें भाषण हें शास्त्रीयपणा, अद्ययावत् व्यासंग नि भेदक चिकित्सा यांचा अुत्कृष्ट संगम होय.

त्यांनी अुपस्थित केलेला अेकमेव प्रश्न म्हणजे आजचें ललितवाङ्मय हें त्याच्या अंतर्गत दोषांमुळे समाजाला आवश्यक असलेलें मार्गदर्शन करूं शकत नाही हा होय. त्यांनी आकुंचित व्यक्तिमत्त्व नि त्याच्या रोगट प्रकृतीमुळे आलेलें अतिरंजकत्व, अयथार्थता अि० दोष दाखविले. मध्यमवर्गीय मनोवृत्तीचें त्यांनी जें विश्लेषण केलें आहे तें कोणासहि पटण्या-

अितकें मडक आहे. आधुनिक विद्वत्तेचा अुत्कृष्ट नमुना म्हणून त्यांच्या भाषणाकडे बोट दाखवितां येअील.

खांडेकरांनी जे आक्षेप घेतले आहेत त्यांबाबत मराठींत अितरांनीहि पुष्कळ लिहिलें आहे. परंतु अधिकारी नि कर्तृत्वशील व्यक्तीने अितक्या मोठ्या स्थानावरून त्या गोष्टीस तोंड फोडलें ही गोष्ट अेका दृष्टीने अत्यंत अुचित झाली असें म्हणतां येअील. त्यांचें आजच्या वाङ्मयांत वात्सल्य, कारुण्य अि० रसांच्या आवश्यकतेचें प्रतिपादन अत्यंत वास्तव असलें तरी, तशा प्रकारची अुच भूमिका व्यासंग नि अनुभव हीं किती मराठी ललितलेखकांचे ठायीं आहेत हा प्रश्नच आहे. ललितलेखकांस त्यांचें भाषण निश्चितपणें मार्गदर्शक होअील यांत शंका नाही. युद्धाच्या भयानकतेच्या दिवसांत आमच्या साहित्यिकांच्या हातीं तुतान्या नसून अलगुजें आहेत असें त्यांनी म्हटलें आहे. त्यांचे आक्षेप कोणासहि— स्वतःचे कृतींच्या बाबतींत त्यांनाहि— अमान्य करतां येणार नाहीत. परंतु १९४१ च्या अुत्तरार्धांत अितकी परिस्थिति चिघळत चालली आहे की, मराठी साहित्यावरील त्यांच्या टीकेचा अनुकूल परिणाम झाला की प्रतिकूल झाला हें सांगतां येत नाही.

मराठी साहित्य हें दोषपूर्ण असेल, त्याचेकडून समाजाच्या निकडीचें कार्य जितक्या निकडीने व्हावें तितक्या निकडीने झाले नसेल आणि ही वस्तुस्थितीच सावरकरांनी 'लेखण्या टाका, नि बन्दुका घ्या' असें सांगण्यास कारणीभूत झालेली असेल. त्या अुपदेशांत कळकळ असली तरी साहित्यिकांविषयीं अितका अविश्वास प्रकट झालेला आहे की, कोणाहि निष्ठावन्त साहित्यिकास ते अुद्गार मान्य होणार नाहीत.

पुरोगामी वाङ्मय म्हणजे काय हा गेल्या पांच सात वर्षांत अत्यंत चर्चेचा विषय झालेला आहे. परंतु फडके-खांडेकरांच्या वा अितरांच्या भाषणांत त्याचा अुल्लेख आला असल्याने त्याविषयी येथे लिहिण्याचें कारण अर्थातच नाही.

**समालोचनात्मक वर्गीकरणः**—आतापर्यंत विवेचिलेल्या, अुपस्थित झालेल्या साहित्यविषयक प्रश्नांचा अेकूण साकल्याने विचार करतां त्याचे स्थूलतः पुढीलप्रमाणे वर्ग पडत असलेले दिसतात.

१ शुद्ध तात्त्विक स्वरूपाचे वाद
 (अ) विद्वत्तामूलक
 (आ) ललितवाङ्मयविषयक
२ भाषा-अभिवृद्धि-अुपायदिग्दर्शन
 (अ) विद्यापीठांत प्रवेश
 (आ) ग्रंथनिर्मितिप्रोत्साहनयोजना
 (अी) ग्रंथांवरील टीका.
३ शब्दव्यापार
 (अ) भाषाशुद्धि
 (आ) लिपिशुद्धि
 (अि) शुद्धलेखनवाद.
४ साहित्य व समाजजागृति
 (अ) निरनिराळे घेतले जाणारे आक्षेप
 (आ) तात्कालिक महत्त्वाचे प्रश्न.

अुपसंहार : अितिहासाचें हें अवलोकन अुद्बोधक होअील या समजुतीनें हा 'अव्यापारेषु व्यापार' केलेला आहे. आजची परिस्थिति खरोखर अुद्बोधकतेचा फायदा घेण्याच्या पलीकडची आहे. युद्धाच्या वावटळीने फडफडूं लागलेलीं जगाच्या अितिहासाचीं पानें अजूनहि फडफडत आहेत नि त्याचें पुढचें पान सुरू होणार की मागचेंच पान परत वाचावयाची पाळी येणार हें आज सांगतां येत नाही. साहित्यिकांचा प्रयत्न निश्चितपणें पहिल्या प्रकारास पोषक झालेला आहे नि होअील. मराठीवर–नव्हे देशावर– आलेल्या आजवरच्या गंडांतरांपेक्षा अत्यंत भयानक असें संकट आज (१९४२) आलेलें आहे. अशा प्रकारें वैचारिक नि अितर वातावरण झांकळून गेलें आहे. असें असलें तरी त्यांतून आजचे साहित्यिक ताऱ्यांप्रमाणे चमकून थोडा कां होअीना मार्ग दाखवितील अशी आशा आहे.

देशाचें भवितव्य बनवावयाचें आहे तें खरोखर रणांगणावर बनवावयाचें आहे. आचार्य अत्र्यांनी म्हटल्याप्रमाणे नव्या जगाची सनद लिहिण्यासाठी थोर मनोभूमिकेबद्दल प्रसिद्ध असलेल्या साहित्यिकांचीच योजना करावी लागेल. परंतु तोपर्यंत जनसमूहाला जागरूक नि कार्यप्रवृत्त करण्याचें आजचें साहित्य कार्य करील नि आजपर्यंत आलेल्या गंडांतरांप्रमाणे याहि संकटांतून मराठीस निश्चितपणें तें सोडवील अशी आशा वाटण्याअितका अिसार त्याने देशास नि महाराष्ट्रास आजपर्यंत दिलेला आहे.

---

## अेकली ज्योत

अुदास काळोखांत अेकली जळत असे ज्योती
जीर्ण देवळापुढे नदीवर या पारावरती !
रातवायुची लहर धावतां भयकंपित होय;
फडफडवी हें पंख पाखरूं कनकवर्णकाय.
नच सांगाती कुठे–दाटली तमोवती रात्र;
कृष्णजलीं थरथरे शलाका सोनेरी मात्र.
मधकर अेकान्तांत घालि ना सार तिला कोणी;
पाराच्या पण तळीं चिऱ्यांशीं कुजबुजतें पाणी.
अवल अन्तरांतील रोधुनी भीती, आशंका;
उधळित राही अंधारावर सोन्याच्या कणिका.
प्रकाश तोही अंधुक अपुरा इवलीशी वात,
आणिक असली भयाण भवती अवसेची रात.
दारें झके ना देअुळही ना देवाची मूर्ती
करी प्रकाशित परी पायऱ्या दिपे ज्या नेत्री.

कुसुमाग्रज

# अनुष्टुभ् आणि पृथ्वी



लें० अ. ज. करंदीकर

अेखाद्या प्रभुभक्ताला ज्याप्रमाणे त्याच्या प्रभूच्याच अस्तित्वाविषयी संशय घेणारे लोक भेटतात, त्याप्रमाणेच प्रत्येक कवीला त्याच्या प्रियेच्या अस्तित्वाविषयी संशय घेणारे लोक भेटतात. असल्या संशयात्म्यांचेच कांही सज्जन बांधव जसे प्रत्यक्ष प्रभूच्या अस्तित्वाविषयी संशय न घेतां त्याच्या जगत्कर्तृत्वाविषयी मात्र संशय घेतात, तसेच कांही शंकित सज्जन कविप्रियेच्या अस्तित्वाविषयी संशय प्रगट न करतां तिचे गुण आणि प्रभाव यांच्याविषयी मात्र शंका प्रदर्शित करतात. या संशयात्म्यांच्या अंतःकरणांत शंकेचें विष याहून कमी प्रमाणांत भिनलें असलें तर भक्ताचें आणि कवीचें आपल्या आराध्यदेवतेवर अेकतर्फी प्रेम असावें अशी त्यांना शंका येते.

शंकेखोरांची ही शेवटची शंका मला नेहमीच निरर्थक वाटते. प्रभेवरील माझ्या प्रेमाविषयी कोणी शंका प्रदर्शित केली तर ती माझ्या ऋजु मनाला खपत नाही. पण प्रभेचें माझ्यावर प्रेम आहे की नाही या गहन प्रश्नाचा मी कधी विचारच करीत नाही. कारण आधुनिक तरुणींच्या प्रणयाच्या कल्पनाच कांही विचित्र होअून बसल्या आहेत. त्यांच्या प्रेमाविषयी अेखाद्याने निःशंक विश्वास बाळगणें म्हणजे आपण दीर्घकर्ण असल्याचा कबूलीजबाब देणें, असेंच त्या मानतात. मालतीमाधवाच्या टीकेंत टीकाकाराने 'निर्व्याजं सौजन्यमेव प्रणयः' अशी प्रणयाची अेक व्याख्या दिली आहे. ही मालतीमाधवांच्या किंवा माझ्या स्वतःच्या प्रणयाला लागू पडेल. पण आजच्या सुशिक्षित रमणींच्यासाठी 'व्याजदौर्जन्यमेव प्रणयः' अशी नवी व्याख्या बनवावी लागेल. कारण,

स्वतंत्र रमणी जरी कृति करी मनोवांछित,  
गमे प्रणयिं ती तरी तिज मनोहरप्रेरित.  
क्रमें ऋजुहि मानिनीहृदय वाम प्रेमीं घडे,  
जडे मन जयावरी रडविणें तया आवडे.

असल्या वर्तनाला कोणी आधुनिक मानसशास्त्रावरून परिचित झालेलीं नावें ठेवतील. पण प्रभेच्या प्रभावाने मारला गेलों असल्याने तें साहस माझ्या हातून होणें अशक्य आहे. असल्या वर्तनाचें समर्थन प्रभा कसें करते, तें मात्र मी सांगूं शकेन.

मागे अेकदा आम्ही टेकडीवर बोलत बसलों असतां कोणाला कोणतें वृत्त आवडतें हा विषय निघाला. तेव्हा माझ्या प्रगतिविरोधी स्वभावाला अनुसरून मीं म्हटलें, 'मला आपलें आदिकवीचें साधेंसुधें अनुष्टुभच आवडतें.' त्याबरोबर खोडकरपणाने मंदस्मित करीत प्रभा म्हणाली, 'तुझा हा मुग्धपणा जाअून तुला कधी विदग्धपणा येणार आहे की नाही याची मला शंकाच वाटते. त्या अनुष्टुभानंतर अितकीं विविध आणि विदग्ध वृत्तें निघालीं आहेत; तरी म्हणे, मला आपलें मोळेंभाबडें अनुष्टुभच आवडतें.' तेव्हा मीं किंचित् चिडून अुत्तर दिलें, 'हे विदुषी, माझ्या मुग्धपणावर आजपर्यंत तूं भरपूर टीका केली आहेस. तिच्यांत पुनश्च भर टाकण्यापेक्षा

तुला कोणतें विदग्धवृत्त आवडतें तें अेकदा अनुग्रह करून मला सांग.' हें अुत्तर अैकून माझ्याकडे अनुग्रहपूर्ण दृष्टीने पाहत प्रभा म्हणाली, 'मला आपलें रम्य आणि आर्त असें केकावलीवृत्तच मनापासून आवडतें.' 'पण केकावली हें कांही अेखाद्या वृत्ताचें नांव नाही. तें मयूरकवींच्या एका काव्याचें नांव आहे.' प्रभेला शब्दांत पकडण्याच्या अिच्छेला बळी पडून मी उद्गारलों. 'तें मलासुद्धा माहीत आहे. पण त्या काव्यानेच पृथ्वीवृत्ताच्या सर्व सौंदर्याचा आविष्कार झाला असल्याने त्या वृत्ताच्या ऐवजी त्या काव्याचें नांवच माझ्या जिभेवर येतें. 'पण प्रभे, केवळ वृत्ताच्या नांवांतच नव्हे, तर त्याच्या वर्णनांतसुद्धा तुझी चूकभूल होत आहे. केकावलीच्या वृत्ताला कोणी रम्य आणि आर्त अशीं विशेषणें लाविलीं तर संस्कृतज्ञांच्या कानांला तीं चमत्कारिक लागतात. कारण,

महाप्रलयमारुतक्षुभितपुष्करावर्तक—
प्रचंडघनगर्जितप्रतिरुतानुकारी मुहुः ॥
रवः श्रवणभैरवः स्थगितरोदसीकंदरः ।
कुतोऽद्य समरोदधेरयमभूदपूर्वः पुरः ॥

अशल्या रौद्र आणि भीषण वर्णनांचा परिपोष करण्याकरिता संस्कृत नाटककार तें वृत्त वापरीत असतात.

'नुसतें संस्कृतचें नांव काढल्याने मी माझे शब्द परत घेईन असें का वाटतें तुला? अितपत संस्कृतची माहिती मलाहि आहे. केवळ कांही संस्कृत नाटककारांचे दाखले दाखविल्याने माझीं विशेषणें चुकीचीं ठरत नाहीत. मयूरकवींसारखे प्राकृत कवीच नव्हेत तर स्वतः संस्कृत कवीसुद्धा रम्य आणि आर्त भावना प्रकट करण्याकरिता याच वृत्ताला शरण गेले आहेत. अुदाहरणार्थ,

'समानकुलशीलयोः सवयसोः परायत्तयोः ।
परस्परविलोकनाकुलितचेतसोः प्रेयसोः ॥
तनुत्वमनुविन्दतोर्बहुविधां व्यथां विन्दतोः ।
अशक्यविनिवेदना विरहवेदना वर्धते ॥'

आमच्या अुभयतांच्या परिस्थितीला अक्षरशः लागू पडणारा हा श्लोक प्रभेने अितक्या आर्त स्वराने म्हणून दाखविला की त्यामुळे माझें चित्त अगदी अस्वस्थ होअून गेलें. तेव्हा मनाला प्रकृतिस्थ करण्याकरिता हसण्याचा प्रयत्न करून मी म्हटलें, 'बरें बुवा, आपण हरलों. तुझ्या विशेषणांना संस्कृत कवींचाहि पाठिंबा आहे हें मी मान्य करतों. पण तेवढ्याने कांही अनुष्टुभापेक्षा पृथ्वी श्रेष्ठ हें सिद्ध होत नाही.' 'पण तूं तरी पृथ्वीपेक्षा अनुष्टुभ् श्रेष्ठ असल्याचें कुठे सिद्ध केलें आहेस?' 'पण प्रभे, मानवांची आदिमाता जी औव्ह, तिला कधी आपल्या प्रथमयौवनांत आपण अितर स्त्रियांपेक्षा अधिक सुंदर असल्याचें सिद्ध करावें लागलें होतें का? अितक्या अुपर तुलना करण्याचा तुझा आग्रहच असेल तर मग अैक. औव्हच्या मनांत सैतानाचा प्रवेश होण्यापूर्वी ती जितकी ऋजु, अनलंकृत अतअेव रमणीय होती. तितकेंच आदिकवींचें अनुष्टुभ्हि ऋजु, अनलंकृत अतअेव रमणीय आहे. अितर सारीं अर्वाचीन वृत्तें हीं औव्हच्या अर्वाचीन अवतारांच्याप्रमाणेच कुटिल, अलंकृत आणि अलंकारप्रिय जनांनाच रमणीय वाटणारीं आहेत. किंवा तुला अगदी स्वदेशी दृष्टान्तच पाहिजे असेल तर असें म्हणतां येअील की, 'रमणीयं प्रसन्नं च सज्जनानां मनो यथा' हें रामायणांतील तमसा नदीचें वर्णन

अनुष्टुभाला पूर्णपणें लागू पडतें, तर 'प्रातिभं त्रिसरकेण गतानां वक्रवाक्यरचनारमणीयः' हें मधुपानानंतरच्या अंगनालापांचें माघांतील वर्णन अर्वाचीन वृत्तांना पूर्णपणें लागूं पडतें.' माझी ही तुलना चालू असतांना प्रमेची सकौतुक दृष्टि सारखी माझ्याकडे लागली होती. माझें बोलणें थांबल्यानंतर सदय स्मित करून ती म्हणाली, 'म्हणजे अेकंदरीने अनुष्टुभ् हें स्वभावोक्तीला अधिक अनुकूल आहे आणि अितर वृत्तें हीं वक्रोक्तीला अधिक अनुकूल आहेत, अितकाच तुझ्या म्हणण्याचा अिरपर्थ दिसतो.' 'हांय.' 'तर मग तुझी कवितेची कल्पनाहि तुझ्या मुग्धपणाला शोभण्याजोगीच आहे असें दिसतें.' 'तें कशावरून?' अविश्वासाच्या स्वरांत मीं प्रश्न केला. तेव्हा आत्मविश्वासनिदर्शक स्मित करीत प्रमा म्हणाली, 'तें कशावरून म्हणून काय विचारतोस? 'स्वभावोक्तिस्तु डिंभादेः स्वक्रियारूपवर्णनम्' असें स्वतः मम्मटानेच सांगितलें आहे आणि त्याकरिताच तुझ्यासारख्या प्रौढ शिशूंना तो संशयित अलंकार अितका आवडतो.' 'केवळ मलाच नव्हे तर प्रत्येक खऱ्या कवीला तो आवडतो. केशवसुतांनी नाहीं का सांगितलें, प्रौढत्वीं निजशैशवास जपणें बाणा कवीचा असे. शिलरनेसुद्धा प्रतिभेची अशीच व्याख्या केली आहे, That is no true genius which is not naive. Nothing but its naïveté makes it genius.'

हीं सारीं सुभाषितें अैकून प्रमेला अनावर हसें लोटलें. हसतहसतच ती म्हणाली, 'तुझ्या या बालमतींत कधी बदल होअील अशी मला आता आशासुद्धा अुरली नाही. अगदीं hopeless आहेस तूं. या जगांत तुला तुझ्याव्यतिरिक्त अेक तरी ऋजु व्यक्ति आढळली आहे का? साऱ्या परिचित व्यक्तींच्या वक्रपणाचा तुला पुरेसा अनुभव आहेच. त्यांच्याविषयी तर बोलायलाच नको. पण अितक्या विविध वाङ्मयांचा अभ्यास करूनसुद्धा तुला अजून हें कळत नाही की या जगांत विधि वक्र आहे, काम वक्र आहे, कामिनी वक्र आहे, अितकेंच नव्हे तर काम, कामिनी आणि कविता यांच्यावर आधिपत्य गाजविणारा ग्रह जो कवि (शुक्र) तो स्वतःच कुटिल राजनीतीचा आचार्य आहे. तूं जर ऋजुत्वाचा पुरस्कार केलास तर काम, कामिनी, कविता आणि कवि या सर्वांच्या अनुग्रहाला मुकशील हें पक्कें लक्षांत ठेव.' 'वास्तविक पाहतां तात्त्विक वादांत कोणी कोणाला निग्रहानुग्रहाचें भय दाखवूं नये ही गोष्ट तुझ्याच लक्षांत यायला पाहिजे. पण तुझी बुद्धि तीव्र असली तरी तुझ्या बुद्धिमत्तानिदर्शक ललाटावर सतत खेळणाऱ्या वक्र कुंतलांच्या सहवासाने तीहि कुटिल बनली आहे. (कचांच्या नैकट्यें निटिलनिहिता बुद्धि कुटिला). आणि त्यामुळे तुला सारें जग कुटिल दिसायला लागलें आहे. तुला वाटतें त्याप्रमाणे काम, कामिनी, कविता आणि कवि हीं वक्रतेचीं निधानें नसून विस्मयाचीं निधानें आहेत. यांच्यापासून आपण नित्य नव्या नवलाची अपेक्षा करीत असतों. या सर्व नवलांत ऋजुत्वापासून उद्भवणारें नवल हें विशेष विस्मयजनक असतें.'

'विस्मयाचे दोन प्रकार आहेत. अेक वक्रतायुक्त विस्मय (Irony) आणि दुसरा वक्रताविरहित अुदात्त-अलंकाराला साजेल असा विस्मय. यांपैकी दुर्लभ अशा दुसऱ्या विस्मयाला अवास्तव महत्त्व देअून तूं स्वतःची दिशाभूल करून घेअूं नकोस. तुझ्या आवडत्या अीव्हला सैतानाने प्रथम पाहिली, तेव्हा तिच्या ऋजु सौंदर्याच्या प्रभावाने तोहि क्षणभर विस्मयचकित झाला. पण तेवढ्याने कांही तिला ज्ञानवृक्षाचें फळ चाखायला लावण्याचा आपला कुटिल संकल्प त्याने टाकला नाही.' 'त्याचें कारण अितकेंच कीं सैतानाला नुसते नेत्रच होते आणि हृदय नव्हतें.' 'स्वतःचे ज्ञाननेत्र न वापरतां गतानुगतिकाप्रमाणे अेखाद्याची

निंदा करूं नये. हृदयहीन व्यक्ति अितरांवर सत्ता गाजवूं शकतात. पण स्वतःला हृदय असल्यावाचून दुसऱ्यांच्या सत्तेविरुद्ध कोणी बंड करूं शकत नाही. सैतान बंडवाला आहे, तेव्हा त्याला नक्की हृदय आहे.' 'प्रमे, सैतानाला तूं कुटिलहि म्हणतेस आणि पुन्हा त्याला नक्की हृदय आहे असेंहि आग्रहाने प्रतिपादतेस. तुझे तुला तरी हे प्रलाप सुसंगत दिसतात का?' 'आता मात्र तुझी पराकाष्ठा झाली! कुटिल लोकांना हृदय नसतेंच असें कोणत्या तर्कशास्त्राने सांगितलें आहे? फार तर ते अितरांच्या हृदयांची क्षिति करीत नसतील. आपल्या भावना वेळींअवेळीं व्यक्त करीत नसतील. पण तेवढ्यामुळे ते आपल्या हृदयाची जन्मभर अुपासमार करीत असतील असें समजण्याचें कांही कारण नाही. अुलट मला तर नेहमी अशी शंका येते की ऋजु लोकांपैकी पुष्कळांना हृदय नसतें आणि अेका काळीं असलेंच तर त्यांनी तें कधीच मारून टाकलेलें असतें.' 'आता मात्र तुझ्यापुढे हात जोडायची पाळी आली. शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम्.' 'अुगीच वेड घेअून पेडगांवाला जाअूं नकोस. अितरांशीं व्यवहार करतांना कुटिल लोक बुद्धीला प्राधान्य देत असले तरी वैयक्तिक गोष्टींत हृदयालाहि प्राधान्य देतात. याच्या अुलट ऋजु लोकांच्या बाबतींत मात्र कधी त्यांना बुद्धि नसावी अशी शंका येते, तर कधी त्यांना हृदयच नसावें अशी शंका येते. मला तर पुष्कळदा असें वाटतें की त्यांच्याजवळ दोहोंचाहि अभाव असावा.' 'पण असें वाटण्याचें कारण तर कांही सांगशील?' 'शाहण्यांना कारण सांगण्याची आवश्यकताच नाही.' मंदस्मित करीत प्रमा सांगूं लागली, 'आणि अितरांना तें सांगितलें तर त्यांना तो बहुधा अपमान वाटेल, म्हणून सांगणार नव्हतें, आता तुलाच विचारते, अिंग्लिश आणि फ्रेंचमध्ये ऋजु लोकांना Enfant terrible म्हणतात, हें तुला माहीत असेलच?' 'बरें, पुढे' 'मग या शब्दप्रयोगावरून त्यांच्या बुद्धि-हीनतेची आणि हृदयहीनतेची तुला जाणीव नाही होत?' 'शब्दप्रयोगावरून केवळ ती भाषा बोलणाऱ्यांचें मत व्यक्त होतें. तेवढ्याने कांही ऋजु जनांचें मनोविश्लेषण होअूं शकत नाही.' प्रतिपक्षाच्या जाळ्यांत अधिकाधिक गुंतत असलेल्या प्राण्यांप्रमाणे चडफडत मीं अुत्तर दिलें. तेव्हा प्रमा म्हणाली, 'मनोविश्लेषणाची आवश्यकता आहे की नाही तें मग पाहूं. आधी मला हें सांग की, ऋजु लोक अेकमार्गी असतात की नाहीत?' 'बरें, पुढे?' 'मग अेकमार्गी लोक अेकतर बुद्धीच्या अभावाने अेकमार्गी बनतात, नाहीतर तत्त्वनिष्ठमुळे अेकमार्गी बनतात हेंहि तुला मान्य असेलच.' 'होय. पुढे?' 'आतां पुढे सांगण्याजोगें कांही अुरलेंच नाही. तत्त्वनिष्ठ लोक किती हृदयहीन असतात किंवा होअूं शकतात हें नीट लक्षांत येण्याकरिता पुन्हा अेकदा तुझ्या आवडत्या आदिकवीने रचलेलें अेकवचनी रामचंद्राचें चरित्र वाच म्हणजे झालें.' 'म्हणजे राम हृदयहीन होता आणि रावण मात्र सहृदय होता असें का तुला म्हणावयाचें आहे?' 'होय, मला असें म्हणावयाचें आहे की सूक्तासूक्त मार्गांने आपल्या मनःकामना पूर्ण करण्याच्या सवअीने येणारा हृदयहीनपणा हा तत्त्वनिष्ठेने अंगीं बाणणाऱ्या हृदयहीनपणाच्या मानाने पुष्कळच कमी भयंकर असतो. रामाच्या हृदयहीनपणामुळे अयोध्येचा जो सर्वनाश झाला त्या मानाने पाहतां रावणाच्या हृदयहीनपणामुळे लंकेची विशेष कांहीच हानि झाली नाही असें म्हणावें लागेल.' 'सीतेला पळवून नेणाऱ्या रावणापेक्षा तिला वनांत टाकून देणारा किंवा अग्निशुद्धि करायला लावणारा राम अधिक निष्ठुर हा तुझा अभिप्राय अेकंदरीने स्त्रीस्वभावाला शोभणाराच आहे.' मी खवचटपणाने अुद्गारलों. 'आणि पुत्रांचा नैसर्गिक शत्रु जो पिता, त्याचे सारे अत्याचार निमूटपणे सोसायला शिकविणारा हा ग्रंथ, मनुस्मृति जाळणाऱ्या आंबेडकरांप्रमाणे तुम्ही प्रकटपणें जाळून टाकीत नाही हेंहि अेकंदरीने

पुरुषस्वभावाला शोभण्याजोगेंच आहे.' प्रभेने प्रत्याघात केला. 'आपल्या चरित्राचे हे अर्वाचीन अनर्थ रामाच्या कानांवर गेल्यास त्यालाहि क्षणभर कौतुकाने हसें आल्यावांचून राहणार नाही.' 'त्याला हसें येवो किंवा न येवो, मला स्वतःला तर रामायणाचें अगदी खरें स्वरूप स्पष्ट करून दाखविणारें नांव शोधून काढल्याबद्दल मयूरकवीचें कौतुक करावेसें वाटतें. रहस्यपूर्ण मुद्रा करून प्रभा म्हणाली. 'स्वतःच्याच लघु शिरांतली अखादी सैतानी कल्पना मयूरकवीच्या माथीं मारण्याचा तुझा विचार दिसतोय.' 'मुळींच नाही. निरोष्ठरामायण हें नांव कांही मीं शोधून काढलें नाही.' 'तें खरें, पण हें नांव केवळ मयूरकवीच्या अेका चमत्कृतीला लागतें. वाल्मीकीच्या रामायणाला कांही लागू पडत नाही.' 'अिथेच तर साऱ्या लोकांची चूक होते. तूं व्हिक्तोर युगोची L Homme Qui Rit ( The Man Who Laughs ) ही कादंबरी वाचली आहेस ना?' 'होय.' 'मग त्या कादंबरीचा नायक कशामुळे नेहमी हसत असलेला दिसत होता तेंहि तुला आठवत असेल.' 'होय, विदूषकाच्या धंद्याला तो अुत्कृष्ट अुपयोगी पडावा, म्हणून दुष्ट लोकांनी लहानपणींच त्याचे ओठ कापून टाकले होते आणि त्यामुळे त्याची बत्तिशी कायमची अुघडी पडली होती.' आदिकवीचीं अनुष्टुभें पाहिलीं म्हणजे मला त्याच अुघड्या पडलेल्या बत्तिशीची आठवण होते. बत्तीसअक्षरी अनुष्टुभाचें माणसाच्या बत्तिशीशीं असलेलें सादृश्य वाल्मीकीच्या जागृत मनाला नसलें तरी सुप्त मनाला नक्की जाणवलें असलें पाहिजे. म्हणूनच त्याने आपल्या काव्यांत मर्कटलीलांना अितका अवसर दिला आहे, आणि हें रहस्य मयूर कवीनेहि ओळखलें होतें; त्यामुळेच त्याला निरोष्ठरामायण हें नांव सुचलें असलें पाहिजे.' प्रभेच्या या अपूर्व रामायणविश्लेषणानंतर घडलेला प्रकार गद्यांत लिहिणें अशक्यच आहे.

अनुष्टुभ रुचे मला ऋजु, विदग्ध पृथ्वी तुला,
तयास्तव विवादलों कविषि ठेवुनी साक्षिला.
अलक्षित नभांतुनी कवि सरे यदा मोहने,
विवाद अनिवार मीं मिटविला अिथें चुंबनें

---

# मराठी-ऑस्ट्रिक वाद

लेखक: श्री. ग. वा. तगारे

अितिहासपूर्व कालांत घडलेल्या घटना जाणण्यासाठी भाषाशास्त्राचा बराच अुपयोग होतो. भाषिक पुराव्यावरून प्राचीन अितिहासांतील घडामोडी निश्चित करणाऱ्या भाषाशास्त्राच्या शाखेला Linguistic Palaeontology असें नांव आहे. भाषाशास्त्राच्या पुराव्यावरून आता निश्चित असें म्हणतां येतें की सद्यःकालीन भारतीय आर्यभाषक समाज, म्हणजे मराठी,

म. सा. प. (१९-१-३)

गुजराथी, हिंदी, बंगाली अित्यादि संस्कृतोत्पन्न भाषा बोलणारे लोक आर्य आणि आर्येतर भाषा बोलणाऱ्या समाजांच्या अेकीकरणापासून निर्माण झाला आहे. आर्येतर भाषा बोलणारांचे दोन भिन्न गट होते– 'द्राविडी'भाषक आणि 'मुण्ड'भाषक. यांपैकी कानडी, तामीळ, तेलुगु, आणि आज लुप्त झाल्यामुळे आम्हांस अज्ञात असलेल्या अुत्तरेकडील कांही भाषा-, बोलणारांचे पूर्वज द्राविडीभाषक होत. आणि आसाममधील 'खाशी', बंगाल व मध्यप्रांतांतील 'संताळ', 'कोरवा', 'भूमिजे' अित्यादि नांवांनी ओळखल्या जाणाऱ्या वन्यजातींचे व त्यांच्या अधिक सुसंस्कृत भाअूबंदांचे (आणि त्यामुळे आजच्या हिंदी समाजांत न ओळखतां येणाऱ्यांचे) पूर्वज 'मुण्ड'भाषक होते. या मुण्डभाषकांना 'ऑस्ट्रो-अेशियाटिक' किंवा 'ऑस्ट्रिक' असें नांव युरोपीय पंडितांनी दिलें असून त्यांच्या भाषासमूहालाहि तेंच नांव वापरतात.

हा 'ऑस्ट्रिक' समाज अिण्डोचायना, मलाया अित्यादि आग्नेय आशियाविभागांत पसरलेला असून यांच्यापैकी कांहींनी अिण्डोनेशिया, मायक्रोनिशिया किंवा पॉलिनेशिया द्वीपसमूहांतुन वसाहती स्थापन केल्या. पासिफिक महासागरांतील द्वीपसमूहांत वसाहती करणाऱ्या 'ऑस्ट्रिक'भाषकांना 'ऑस्ट्रोनेशियन' अशी संज्ञा आहे. मराठीचा आणि पर्यायाने संस्कृतोत्पन्न भारतीय भाषांचा 'ऑस्ट्रोनेशियन' भाषांशीं कांही संबंध आला नाही. जो कांही आला तो प्राचीन काळच्या 'ऑस्ट्रो-अेशियाटिक' किंवा 'ऑस्ट्रिक'भाषकांशीं आला.

भाषिकवादांत शिरण्यापूर्वी प्रथमतःच हें मान्य केलें पाहिजे की अुत्तरआशियांतील आपल्या मूलस्थानापासून अिराणपर्यंत मटकत आलेल्या आर्यसमाजाने भरतखण्डांत प्रवेश केल्यानंतर अेतद्देशीय समाजाकडून भाषिक व सांस्कृतिक अुसनवारी केली. मानववंशशास्त्राने आपला समाज भिन्न मानववंशांच्या संकरापासून झाला आहे हें सिद्ध केलें आहे. तसेंच आपल्या संस्कृतींत व भाषांत आर्येतरांचा पुष्कळच भाग आहे. [ अेतद्विषयक साहित्याची सूचि कॉंस्तॉंतें रेगमी (Constantin Regamey) यांनी Bulletin de l'rcole francaise de l' Extreme- Orient या नियतकालिकाच्या ३४ व्या वर्षांतील (१९३५) पृ. ४२९-५६६ मध्ये "Bibliographie analytique des Travaux relatifs aux E'le'ments anaryens dans la Civilisation et les Langues de l'Inde" या शीर्षकाखाली प्रसिद्ध केली आहे ती पाहावी. ] त्यामुळे कापसाचीं वस्त्रें विणण्याची कला, किंवा विड्याचीं पानें खाण्याचा शौक, अथवा वृक्षपूजन किंवा वेताळ, मुंजाबासारख्या निराकार दगडगोट्यांची पूजा अित्यादि गोष्टी आम्ही आस्ट्रिक समाज आत्मसात् करतांना स्वीकारल्या याबद्दल फारसा मतभेद नाही. लेव्हि, प्रिझिलुस्कि, ब्लोक, चतर्जी अित्यादि पंडितांच्या लिखाणावरून कापूस, धनुष्य, बाण, नांगर अित्यादि संस्कृतोत्पन्न भाषांतील शब्द मूळचे ऑस्ट्रिक आहेत असें दिसतें. पण त्यांचें संस्कृतीकरण वा प्राकृतीकरण अितक्या जुन्या काळीं झालें आहे की ते मराठी, हिंदी, गुजराथी अित्यादि अर्वाचीन भारतीय आर्यभाषांतील 'ऑस्ट्रिक' अुसनवारी आहेत असें ठरवणें विवाद्य ठरेल.

भारतीय आर्यभाषांतील ऑस्ट्रिक ऋण निश्चित करतांना अुत्साहाचा थोडा अतिरेक होतो. संस्कृत किंवा प्राकृत शब्दांचें पृथक्करण करून त्यांच्याशीं साधारण ध्वनिसाम्य व अर्थसाम्य असणारे शब्द मलाया द्वीपकल्पांतील किंवा अिंडोचायनांतील बोलींत आढळले की ती संस्कृतोत्पन्न भाषांतील ऑस्ट्रिक अुसनवारी मानण्यांत येते. अुदाहरणार्थ, आपण 'वरुण' हा शब्द घेअूं. हा शब्द अुत्तर आशियामायनरमध्ये बोघाझ्कोअि येथील अुत्खननांत सांपडलेल्या

साहित्यांत 'अ-रु-न', 'अु-रु-अुअ-न' या स्वरूपांत आढळतो. या रूपांचा काळ खि. पू. १४०० आहे. ज्याँ प्रिझिलुस्कीनी आपल्या "Varuna, God of the Sea and the Sky" (JRAR 1331) या निबंधांत अुपर्युक्त दोन शब्द आणि वैदिक 'वरुण' यांचा संबंध ऑस्ट्रो-अेशियाटिक 'वरु' (समुद्र) या शब्दाशीं जोडला आहे. वस्तुतः हा मूळचा समुद्राचा देव नव्हे. हा मूळचा आकाशाचा देव असून Ouranos हें त्याचें प्राचीन भारतयुरपीय स्वरूप आहे. वरुण व Ouranos हे दोन्ही शब्द *अुअेर (Uer—) 'बांधणें' या धातूपासून झाले असून 'पाशबद्ध करणें' ही कल्पना त्या दैवताच्या मुळाशीं आहे. (G Dume'zil: Ouranos- Varuna, Paris 1934).' पुण्याच्या प्रा. रा. ना. दांडेकरांनी वरुणाच्या आधारभूत कल्पनांचें परीक्षण करून वरुणकल्पनेंत जागतिक (Cosmic) व नैतिक बंधन व्यक्त होतें असें सिद्ध केलें आहे (ABORI, 21,1940). प्रिझिलुस्कींच्या अुत्साहातिरेकामुळे आर्यांच्या भारतवर्षांतील प्रवेशापूर्वी अस्तित्वांत असलेल्या शब्दांत सुद्धा 'ऑस्ट्रिक' अुसनवारी दिसूं लागली हें लक्षात ठेवण्यासारखें आहे. प्रिझिलुस्कींचा हा आग्रहीपणा वैदिक 'नासत्यौ' (अश्विनीकुमार) या शब्दाचें मूळ ऑस्ट्रो-अेशियाटिक 'सत्य' (घोडा) या शब्दांत शोधतांना पुनः आढळतो (पाहा : "Les As'vin et la grande De'esse." HJOS 1936 )

सांगण्याचा मुद्दा अितकाच की संस्कृतोत्पन्न भाषांतील ऑस्ट्रिक अुसनवारी ठरवतांना (१) तो शब्द प्राचीन भारतयुरोपीय व प्राचीन भारतपारसीक अवस्थांत आढळत नाही, (२) भारतीय आर्य भरतखण्डाबाहेर मलाया, अिण्डोचायना अित्यादि ऑस्ट्रिकभाषक देशांत व्यापार, धर्मप्रसार, वसाहती अित्यादि अनेक कारणांनी संचार करीत असतां तो तद्देशीयांनी त्यांच्यापासून घेअून त्याला ऑस्ट्रिक रूप दिलें नाही, आणि (३) तो शुद्ध ऑस्ट्रिक आहे असें सिद्ध केलें पाहिजे; निदान पहिल्या दोन गोष्टी जरी झाल्या तरी पुरे.

संस्कृतोत्पन्न भाषांत आज आढळणारे बरेचसे ऑस्ट्रिक शब्द प्राचीन व मध्ययुगीन भारतीय आर्य काळांत (खि. श. ११०० पर्यंत) आत्मसात् केले गेल्यामुळे ते मराठीने (दाक्षिणात्य आर्यभाषेच्या अर्वाचीन अवस्थेने) ऑस्ट्रिक भाषांपासून घेतलेलें ऋण आहेत असें मानतां येतील की नाही याबद्दल शंका असली तरी शब्देतिहासाच्या दृष्टीने ही चर्चा अत्यावश्यक आहे.

---

# लातिन भाषा व कांही संस्कृत व मराठी शब्दांची व्युत्पत्ति

ले. : वि. वि. दीक्षित

१. मुरारि मुर + अरि (कृष्ण) लातिन मोरोर (moror) विलंब लावणें, थांबविणें यावरून मुर = थांबवून धरणारा (पाणी अथवा प्रकाश) राक्षस, वैदिक वृत्र, अहीचा पौराणिक प्रतिनिधि; मोरावळा शब्दांत मोर शब्द लातिन मोरोरशीं संबद्ध आहे. मुरणें क्रियापदहि तद्वत्.

२. शृंगार, शृंगाररसांत अलंकार व वेषभूषेस अुद्दीपन विभाव म्हणून विशेष महत्त्व. अलंकारांत मेखलेस ( कमरपट्टा ) विशिष्ट स्थान कवि देतात ( न्यासीकृता स्थानविदा स्मरेण मौर्वी द्वितीयामिव कार्मुकस्य ) लातिन्–अकिंगोर (acoingor) कमर बांधणें. हा धातु शृंगाराचें दुसरें रूप आहे. ( लातिन् क ज्या ठिकाणीं संस्कृत श येतो. ) ' प्राधान्येन व्यपदेशा भवन्ति ' या न्यायाने वेषभूषेंतील महत्त्वाच्या क्रियेस म्हणजे कमरपट्टा मोहकपणें बांधण्यास शृंगार म्हणूं लागले. वीररस शृंगाराशीं संबद्ध असल्याने अकिंगो = वीरवेष धारण करणें असा अर्थ आहे.

३. हुलवा, हूल. लातिन्–उलुलो ( ululo ) ओरडणें, दणाणून सोडणें.

४. चणचण, लातिन् : केनो ( ceno ) भोजन करणें. कन कन = अन्न अन्न धान्याचें दुर्भिक्ष झालें असतां होणारी स्थिति, कनकन = चणचण; कोणत्याहि गोष्टीचा तुटवडा; मूलार्थ अन्नाचा तुटवडा.

५. सत्यभामा ( कृष्णाची आवडती स्त्री ) यांत सत्य व भाम असे दोन अवयव आहेत. भा धातूचा प्रकाशणें हा अर्थ तितकासा अन्वर्थक वाटत नाही. ला. माम (Fama) वार्ता, लौकिक हा अर्थ लावल्यास सत्यवचनी असा लौकिक असणारी स्त्री.

६. कौरयाण–निरुक्तांत याचा अर्थ कृतयान ( केलेलें ) सुशोभित आहे यान म्हणजे वाहन ज्याचें असा आढळतो. कौर कृताचा अपभ्रंश संभवत नाही. कारण कौ अुदात्त आहे. लातिन्–कुर्रुस् ( currus चाक, रथ ) शब्दाशीं कौर शब्द जुळता आहे. ( चक्र–कक्र-कर्र ) करकर वाजणारें कर्र = कर्रस्. चाकावरून नन्तर रथ हा अर्थ लावण्यांत आला. कौरयाणः रथांत बसून जाणारा किंवा चक्रावर आरूढ होअून जाणारा.

७. वावदूक–शब्दच्छल करणारा, विविध प्रकारें विचार व युक्तिवाद मांडणारा. यांत तीन अवयव आहेत. वा + वा + दूकः लातिन् दुको = विचार करणें; असें असेल का तसें असेल असा एकाच गोष्टीविषयी विचार करणारा ( वा वा शब्दांनी अनेक पर्याय सूचित केलेआहेत. )

८. मुचकुन्द–कुन्द प्रत्यय स्वभावविशेष दर्शवितो. लातिन् iracundus ( इरा + कुन्दुस) इरा = क्रोध. म्हणून रागीट, शीघ्रकोपी (इंग्रजी Jocund पाहा.) मुच् , सैल सोडणें, मोकळे करणें, यावरून उदार स्वभावाचा असा मुचकुन्दाचा अर्थ.

९. कर्दनकाळ–कर्दन् + काळ. मृत्यूप्रमाणे भयंकर. लातिन् corde (कोर्दे) हृदय = काळासारखें आहे हृदय ज्याचें.

१०. अक्रित–( अक्रित बोलूं नये ) लातिन्–आकेर ( acer ) तीक्ष्ण भयंकर.

११. आकस–आकसाने. लातिन्–occido (ओक्किदो) फ्रेंच occire ,ऑाक्सिर=वध करणें. यावरून तीव्र द्वेषाने असा मराठींत अर्थ आला. वधांत द्वेषाची परमावधि सूचित केली जाते.

१२. चारु ( चारुगात्री, चारुशीला ) सुन्दर. हा चरु मांस (पिण्ड) या शब्दांपासून आला आहे. ( ला. कारुस् ). चरु हा पुढे तांदुळाचा व यवाचा हवनांत करण्यांत येअूं लागला. ( व्रीहिमयश्चरुर्भवति, यवमयश्चरुर्भवति ). लातिन्-(करो) caro = मांस. सौन्दर्याचें अधिष्ठान, शरीराचा मांसल भाग. क चा श न होतां संस्कृतांत च झाला. फ्रेंचमध्ये श होते. चारु = cher. मांसल–सुन्दर–म्हणून प्रिय. इंग्रजी cheer. मांसल हरिणादि वध्य पशु दृष्टीला सुन्दर दिसतात व आहारदृष्ट्या सुद्धां ते माणसाला प्रिय वाटतात. Without cheer म्हणजे चरुहीन – अन्नहीन, रोडका, निस्तेज.

# ‘अडका’

## (‘किंचित् व्यावहारिक द्रव्य’)



‘अडका’ ह्या शब्दाच्या व्युत्पत्तिबद्दल व कानडी आणि मराठी भाषांत प्रस्तुत काळीं रूढ असलेल्या त्याच्या अर्थाबद्दल चार शब्द खाली लिहिले आहेत. ह्याचा उपयोग मराठी व कानडी भाषा आणि संस्कृति यांचा तौलनिक अभ्यास करणाऱ्या लोकांस होईल असा भरवसा वाटतो.

वीस पंचवीस वर्षांपूर्वी महाराष्ट्रांत किलेक गांवीं बाजारांतून कवड्यांची देवघेव होत असे; त्याप्रमाणेच अेके काळीं ‘अडिके’ म्हणजे सुपारीची देवघेव होत असावी.

पैसा-अडका हा जोडशब्द सर्वांच्या परिचयाचा आहे. अशा शब्दांतील दोन्ही शब्द अेकाच अर्थाचे असतात हें सर्वमान्य आहे. यावरून पैशाप्रमाणे अडका देखील विनिमयाचें अेक साधन होतें हें सिद्ध होतें. महाराष्ट्र-शब्दकोशांत दिलेलें कोष्टक असें:-- १ अडका = ½ रुका, १ रुका = १ पै. यावरून ४८ अडके म्हणजे = १ आणा गणला जात असे असें झालें. तथापि अडक्याचा अर्थ काय हें त्या कोशावरून स्पष्ट होत नाही. ‘अडका’ हा शब्द ‘अर्ध-रुका’ यावरून आला असावा, अथवा ‘अर्धक’ शब्दाचा ‘अडका’ हा तद्भव असावा असें कोश म्हणतो. परंतु व्युत्पत्ति दोन तऱ्हेने सुचविल्यावरून ‘अडका’ हा शब्द कसा तयार झाला हें निश्चितपणें सांगतां येत नाही अशी कबुली दिल्यासारखें होतें. अर्धरुका हा समास विचित्र दिसतो, कारण अर्ध हा शब्द संस्कृत असून रुका हा अरबी शब्द आहे. अडका हा शब्द अर्धक शब्दापासून निघाला म्हणावें तर अर्धक या नांवाचें नाणें व्यवहारांत असल्याचें अजून प्रत्ययास आलें नाही. शिवाय रुक्का व्यवहारांत येण्यापूर्वी म्हणजे मुसलमानांच्या आगमनापूर्वी देखील ‘अडका’ हें विनिमयाचें साधन असावें असें मराठी व कानडी या दोन्ही परंपरांवरून दिसून येतें.

‘हातांत नाही अडका, बाजारांत निघाला धडका’ अशा प्रकारचीच म्हण कानडींतहि वाक्प्रचाररूपाने आहे. अि. स. ९३२च्या सुमारास होअून गेलेल्या पंप नांवाच्या महाकवीने हा वाक्प्रचार आपल्या काव्यांत अेका प्रसंगीं अुपयोगांत आणिला आहे. द्रोण आपला बाल-मित्र जो द्रुपद राजा त्याच्याकडे साहाय्य मागण्याकरिता जातेवेळीं ‘आपल्या हातांत अेक अड-काहि नाही (अडकेयु कैयोळिल्ल) असें म्हणतो. मराठी प्रान्तांत ‘कोंकरूं ग्या कोंकरूं’ हा खेळ, खेळतात. त्या वेळीं ‘कोंकरूं हवें का कोंकरूं! कित्क्याला! अडक्याला. जळला तुमचा अडका आमचं कोंकरूं लाडकं’ असें म्हणण्याचा प्रघात आहे. वरील दोन्ही अुदाहरणांवरून अडका हें किंचित् व्यावहारिक द्रव्य किंवा विनिमयाचें कनिष्ठ साधन असावें हें स्पष्ट होतें. अि. स. ९३२ सालीं अडका व्यवहारांत होता. त्या काळीं महाराष्ट्रांत अरबी शब्द सामान्य व्यवहारांत आले नव्हते असें त्या काळच्या कानडी, प्राकृत व संस्कृत भाषांच्या आधारें सांगतां येअील.

म्हणून अडक्याची व्युत्पत्ति लावतांना त्याचा संबंध अर्धरुका अगर अर्धक याशीं जोडण्याचें कारण नाही. मराठींत सर्रास अुपयोगांत आणिलेल्या अडकोता किंवा अडाकित्ता हा शब्द आम्हांस ‘अडका’ या शब्दाचा सुगावा लावण्यास फार अुपयोगी पडणार आहे. अड-

कोता हा शब्द कानडींतून मराठींत रूढ झाला ही गोष्ट निर्विवाद आहे. महाराष्ट्र-शब्दकोश-कारांसहि ही गोष्ट मान्य आहे. अडकोता म्हणजे अडका + कोयता. ( कोयता—कापण्याचें साधन ) यांत अडका म्हणजे सुपारी असा अर्थ स्पष्ट आहे.

'अडक्याची भवानी आणि बारा रुपयांचा गोंधळ' अशी म्हण आहे. यांत अडक्या-च्या ( सुपारीच्या ) रूपाने मांडिलेली भवानी, पण त्या भवानीपुढे गोंधळ घालावयास मात्र बारा रुपये खर्च ! असा अुपरोध सुचविला आहे. येथे भवानीरूपी अडका म्हणजे सुपारीच होय. नवग्रहपूजनाचे वेळीं अगर गणपतिपूजनाच्या वेळीं सुपारी ( अडकी ) मांडून तीच देवता समजण्याची पद्धत सर्वत्र आहे.

देवापुढे ठेवितेवेळीं किंवा ब्राह्मणांस देतेवेळीं किंचित् व्यावहारिक द्रव्य म्हणून सुपारीचा अुपयोग केला जातो. अेखादा व्यवहार ठरला म्हणजे अिसारा म्हणून कांही पैसे देण्याची पद्धत हल्ली रूढ आहे. तसेंच पूर्वी व क्वचित् प्रसंगीं हल्ली देखील, 'पहिली बोली' अगर अिसारा म्हणून सुपारी ( अडका हाच पैसा—व्यावहारिक द्रव्य अशी समजूत असल्यामुळे ) देण्याची पद्धत होती व आहे. पहिल्या गिऱ्हाअिकाकडून होणाऱ्या व्यापारास भवानी किंवा बोणगी म्हणण्याचा संप्रदाय आहे. 'अडक्याची भवानी...' या म्हणींत सुचविल्याप्रमाणे भवानी 'अडक्याची'-सुपारीची पहिला व्यवहार—व्यापार रोख कवडीचा—सुपारीचा जरी झाला तरी तो शुभ असें मानण्याची पद्धत आहे.

आपण कोणाच्या कसल्याहि ऋणांत नाही असें सुचवावयाचें असल्यास 'मी कोणाचा, सुपारीच्या खांडाचाहि, मिंधा नाही असें म्हणण्याची चाल आहे. येथे सुपारी ( अडका ) हें अत्यंत कनिष्ठ प्रतीचें नाणें ( कवडीप्रमाणे ) असें ध्वनित होतें. वरील वाक्प्रचार कानडी साहित्यांतसुद्धा दिसून येतो. १६ व्या शतकांतील 'बसव' पुराणांत हा वाक्प्रचार आला आहे.

'अडका' हा शब्द सर्व द्राविड—भाषावर्गांतून दिसून येतो. अडय् काय् ( तामीळ ), अडकाय ( तेलगू ), अडक्क ( मलियाळी ), अडके ( कानडी ). या सर्व शब्दांतील मूळ शब्द 'अड' किंवा 'अडे' असा आहे. अडे, अड यांचा धात्वर्थ रास, संग्रह, अगर घोंस असा आहे. मराठींत देखील 'अडी' ( आंब्याची अडी घाल ) शब्द रास या अर्थी अुपयोगांत आला आहे. मराठी आडींतील अड शब्द कानडी आहे व तो राशी—संग्रहवाचक आहे. सुपारीचे केव्हाहि घोंस असतात; त्यामुळे सुपारीला अडका म्हणजे घासफळ असें नांव प्राप्त झालें. अडका यांतील मूळ शब्द जो 'अड' त्याचा अर्थ समजल्यावर सुपारीला अडका हें नांव देण्यांतील औचित्य मनास पटतें.

कवडीप्रमाणे अडका हें कर्नाटक—महाराष्ट्रांतील अेके काळचें विनिमयाचें कनिष्ठ साधन होतें हें वरील विवेचनावरून स्पष्ट होतें. अडकोत्याप्रमाणे अडका हा शब्द कानडींतून मराठींत आला ही गोष्ट सर्वमान्य आहे. तथापि अडका ( अडके ) म्हणजे सुपारी हें व्यवहारद्रव्य होतें ही गोष्ट मराठी भाषा व साहित्य यांच्या साहाय्याने सिद्ध होते.

शं. बा. जोशी

अनुक्रमणिका

## परीक्षण-विभाग



### टीका: —

**१ प्राचीन मराठी कविपंचक**—ले० दत्तात्रेय सीताराम पंगु, राजाराम कॉलेज, कोल्हापूर; किंमत २॥ रुपये.

**२ ग्रंथांच्या सहवासांत**—ले० गं. भा. निरंतर; प्रका० परचुरे पुराणिक आणि मंडळी; किं. २ रु.

प्रा. पंगु हे प्राचीन मराठी वाङ्मयाच्या संपादनाकडे विशेष लक्ष पुरवीत आहेत ही अभिनंदनाची गोष्ट आहे. त्यांनी आतापर्यंत वत्सहरण, सीतास्वयंवर, ज्ञानेश्वरी अध्याय १२ व १६, वनपर्व, कुशलवोपाख्यान इत्यादि प्राचीन मराठी कवींचें काव्य विश्वविद्यालयांतील विद्यार्थ्यांस उपयोगी होईल अशा रीतीने प्रसिद्ध केलें आहे. संपादनाचें कार्य करीत असतां समालोचन व संशोधन या गोष्टी क्रमाने प्राप्त होतात. वरील काव्यांच्या प्रास्ताविक निबंधांत कांही प्राचीन मराठी कवींविषयीं असें विवेचन येऊन गेलें आहे. तथापि प्रस्तुत प्राचीन कविपंचकांत मुक्तेश्वर, वामनपंडित, नागेश, रघुनाथपंडित, निरंजनमाधव असे पांच कवि निवडले आहेत. श्री. माडखोलकर यांनी आधुनिक कविपंचकांत केशवसुत, रे. टिळक, विनायक इत्यादिकांची निवड करतांना जी दृष्टि ठेविली तीच येथे आहे असें म्हणतां येणार नाही. कोणालाहि ज्ञानदेव सोडून पुढे जातां येणार नाही, परंतु अन्यत्र परामर्श घेतल्यामुळे येथे त्याचा समावेश नाही. कोणत्याहि दृष्टीने निवड केलेल्या प्राचीन मराठी कवींचा परिचय स्वागताईच आहे. कविपंचकांतील मुक्तेश्वर, नागेश इत्यादि कवींचें काव्यसमालोचन लेखकाने केलें आहे. ज्या काळीं व ज्या सांस्कृतिक वातावरणांत प्राचीन मराठी काव्य निर्माण झालें त्याची योग्य जाणीव ठेवून जागोजाग समर्थक आधार देऊन प्राचीन मराठी काव्यविषय व काव्यपद्धति यांविषयी सहानुभूतीची वृत्ति राखून परंतु आधुनिक वाङ्मय-चिकित्सेचीं तत्त्वें दृष्टिआड न करतां प्रा. पंगु यांनी गुणदोषविवेचन समतोलपणाने केलें आहे. परंतु वामनपंडित, रघुनाथपंडित, निरंजनमाधव यांविषयी काव्यसमीक्षणाचें कार्य हें लेखकाला मुख्यत्वाने करावयाचें आहे असें दिसत नाही. मुक्तेश्वर, नागेश यांपुरतें जसें तें यथोचित झालें आहे, तसेंच सर्वांचे बाबतींत झालें असतें तर काव्यसमा-लोचनाच्या महत्त्वाच्या दृष्टीने ग्रंथाला स्वयंसंपूर्णता आली असती. कविपंचकांतील सर्वच कवींच्या संबंधाने त्यांचा कालनिर्णय, चरित्रविषयक माहिती, त्यांविषयी ऐतिहासिक पुराव्याची छाननी हेंच कार्य साक्षेपाने केलें आहे. हें कार्य संशोधनाचें आहे आणि प्राचीन मराठी इतिहास म्हणजे अजूनहि बराच अनिश्चयात्मक असल्यामुळे असें संशोधन जसें दुर्घट तसेंच सर्वाधिक महत्त्वाचें आहे. प्रत्येक कवीविषयी असे कांही विवाद्य प्रश्न प्रस्तुत प्रबंधांत चर्चिले आहेत.

ज्या संशोधनाचा पाया कै. राजवाडे, कै. भावे, कै. पांगारकर व श्री. आजगांवकर यांनी रचिला त्याविषयी अलीकडच्या काळांत अधिक माहिती उपलब्ध झाल्यामुळे, किंवा

अुपलब्ध सामग्रीच्याच बळावर, कांही भिन्न अनुमानें काढतां येणें अशक्य नाही. सत्याचें शोधन नेहमीच होत राहणार. प्रस्तुत कविपंचकांत नवीन अस्सल पुरावा मिळवून अगर काव्यग्रंथ प्रकाशांत आणून मूलगामी संशोधन केलें आहे असें नाही. पूर्वीच्या संशोधकांनी दिलेल्या माहितीविषयी कांही आक्षेप घेऊन व त्याविषयी चिकित्सा करून आपल्या भिन्न मतांची मांडणी केली आहे. ही चिकित्सादृष्टि अभ्यासकास विचारप्रवृत्त करील यांत शंका नाही. मुक्तेश्वर, वामनपंडित इत्यादिकांविषयी सर्वांगीण अगर प्रायः स्वतंत्र असें संशोधक विवेचन कविपंचकासारख्या लहान ग्रंथांत करणें शक्य नाही व लेखकाची तशी प्रतिज्ञाहि नाही. ज्या कांही विवक्षित प्रश्नांची चर्चा प्रस्तुत प्रबंधांत आली आहे त्यांचें दिग्दर्शन यापुढे करूं.

"कोडितकर अत्रे यांच्या दप्तरांतील टिपणवहीवर व सरंजामे यांच्या जंत्रीवर विसंबून कै. भाव्यांनी आणि तंजावर येथील गोविंद ब्रह्माळ स्वामींच्या मठांतील कोणत्या तरी वहींतील नोंदीवर विश्वसून रा. दा. के. ओक यांनी मुक्तेश्वर हे रामदासांपेक्षा अेक वर्षाने लहान व समवयस्क असा जो गैरसमज प्रसृत केला आहे, त्याला आळा बसेल अशी आशा आहे." "मुक्तेश्वराच्या काव्यांत स्वराज्योन्मुख महाराष्ट्राचें चित्र नसून, मुसलमानी सत्तेने गांजलेल्या मनःस्थितीचें प्रतिबिंब पडलेलें आहे." मुक्तेश्वराच्या काव्यांत येणारे विपुल जुने शब्द व प्रयोग यांचा आधार दाखवून कालदृष्ट्या तो लोलिंबराज-सामराजाप्रमाणे अेकनाथयुगाकडे जसा झुकतो तसा रामदासयुगाकडे मुळीच झुकत नाही असा निष्कर्ष लेखकाने काढला आहे, व तो विद्वानांच्या चिकित्सक बुद्धीला सादर केला आहे.

वामन-पंडितासंबंधी केलेली चर्चा सूक्ष्म विचाराची द्योतक आणि अुद्बोधक आहे. अनेकत्वाची बाधा प्राचीन मराठी कवींपैकी पुष्कळांच्या वांट्यास आली आहे. कै. बा. अ. भिडे यांचें 'वामन पांच होते' हें मत, तसेंच अलीकडे रा. रंगनाथ केशव सांकळे यांचें 'वामनपंडित दोनच' हें मत सविस्तर पारखून त्यांमध्ये वस्तुस्थितीपेक्षा तर्काचाच भाग अधिक आहे असा अभिप्राय दिला आहे. वामनपंडिताच्या प्रचलित कवितेंत हरिवामनाच्या कवितेचा प्रवाह कसा मिळाला आहे, 'वामनस्वामींच्या अगदी समकालीं रामदासशिष्य वामन-गोसावी अगर वामनरामदासी अथवा यमक्या वामन ही व्यक्ति काव्यक्षेत्रांत वावरत असली तरी यापुढे मराठी वाङ्मयांत वामन म्हणजे यथार्थदीपिकाकार वासिष्ठगोत्री वामनस्वामी शेषे यांची अेकमेव मूर्तिच डोळ्यांसमोर अुभी राहणार आहे' असें आपलें मत मांडतांना लेखकाने अेतद्विषयक भिन्न मतांची चिकित्सा सविस्तर केली आहे. वामनपंडितांच्या विविध काव्यनिर्मितीचें निर्णायक स्वरूप दाखवून शेवटीं वामनपंडित अगर वामनस्वामी हे श्रीसमर्थरामदासांपेक्षा जसे वयाने वडील होते तसेच ते शिवकालांतील सामराज, नागेश, विठ्ठल रघुनाथपंडित अित्यादि कलाकवींहून ज्येष्ठ होते हा मुद्दा थोडाफार नवीन असल्याचें लेखकाने सांगितलें आहे. नागेशाचें सीतास्वयंवर प्रस्तुत ग्रंथकाराने स्वतंत्रच संपादिलें असल्यामुळे या प्राचीन कविपंचकांतहि नागेशाविषयी भरपूर माहिती आली आहे. त्याचप्रमाणे निरंजनमाधवांची कविता, संप्रदायपरिमळ, पेशवे दप्तर, मराठी रिसायत, सुभद्राचंपू अित्यादिकांच्या आधारें निरंजनमाधवाच्या चरित्राविषयी विपुल माहिती व ग्रंथचिकित्सा पांचव्या निबंधांत आली आहे. संप्रदायपरिमळ हा ग्रंथ निरंजनमाधवांच्या कोणींतरी शिष्याने त्याच्या देखरेखीखाली रचिला असावा असें अनुमान करतांना ग्रंथाच्या अंतर्गत पुराव्याची चिकित्सा केली आहे. पहिल्या बाजीरावाच्या वेळेपासून चांगला मुत्सद्दी व राजकारणी

म्हणून कार्यव्यापृत असलेल्या निरंजनमाधवाचें अंतरंग अध्यात्म आणि कवित्व यांनी कसें परिपूर्ण होतें हें दाखविल्याने प्रायः विरोधी गुणांच्या अेकसंस्थेचें दर्शन मनोरम वाटतें.

प्राचीन कविपंचकांतील रघुनाथपंडितांचा परिचय चरित्रात्मक गोष्टींच्या चिकित्सेला वाहिलेला आहे. त्यांत मुख्यत्वेंकरून श्री. प्रियोळकरांनी नलदमयंती स्वयंवराख्यानाच्या प्रस्तावनेंत रघुनाथपंडितांविषयी जी महत्त्वाची माहिती निरनिराळ्या ठिकाणांतून शोधून काढिली आहे आणि तिच्या आधारावर त्यांनी नलोपाख्यानकर्ता रघुनाथ पंडित व शिवाजीच्या अष्टप्रधानांपैकी न्यायशास्त्री पंडितराव हे अेकच हा जो सिद्धान्त मांडला आहे त्यांतील पुराव्याची छाननी करून वरील मतावर प्रा. पंगूंनी जबर आक्षेप घेतला आहे. आणि शहाजीच्या कर्नाटकांतील जहागिरीचे प्रसिद्ध दिवाण, शिवाजीमहाराजांस दक्षिणेंत मराठी साम्राज्याचा प्रसार करण्याविषयी मसलत देणारे, व व्यंकोजी व संभाजी यांस निःस्पृहतेने सडेतोड अुपदेश करणारे असे राजकारणपटु रघुनाथ नारायण हणमंते हे नलोपाख्यानाचे कर्ते असावे असा स्वतंत्र पक्ष मांडला आहे. अितकेंच नव्हे तर याविषयी त्यांना कोणतीहि शंका वाटत नाही. हा नूतन सिद्धान्त मांडण्याला लागणारा पुरावा पुरेसा आहे असें दिसत नाही. स्वतंत्र पुरावा तर मुळीच नाही. मागील संशोधकांनी जी सामग्री पुढे केली व जीं अनुमानें काढलीं त्याच सामग्रीचा अुपयोग करून निराळें अनुमान काढावयाचें, पूर्वीच्या सिद्धांताबद्दल आक्षेप घ्यावयाचे, त्याच साधनांची अधिक छाननी करावयाची, हेंच कार्य लेखकाने या ग्रंथाच्या संशोधनात्मक भागामध्ये प्रायः व रघुनाथपंडितासंबंधे विशेषेंकरून केलेलें दिसतें. फक्त ग्रंथांतर्गत भाषाविषयक पुरावा तेवढा स्वतःचा असा सादर केलेला दिसतो. परंतु तेवढ्याने शिवकालीन सात रघुनाथांपैकी नलोपाख्यानाचा कर्ता अमुकच असें म्हणतां येत नाही. रा. प्रियोळकरांच्या सिद्धांताबद्दल आक्षेप समर्पकपणें घेतां येतील. त्याचप्रमाणे रघुनाथ-पंडितराव, रघुनाथभट अुपाध्ये (न्यायशास्त्री), रघुनाथभट चाअूरकर हे व नलोपाख्यानकर्ता रघुनाथपंडित अेक नव्हेत असें म्हणणें शक्य असलें तरी नलोपाख्यानाचें कर्तृत्व रघुनाथ नारायण हणमंते यांस बहाल करतांना अस्तिपक्षीं स्वतंत्र पुरावा पाहिजे. त्याचें ग्रंथकर्तृत्व, विशेषतः त्याची काव्यरचना थोडीथोडकी अुपलब्ध झालेली पाहिजे. त्याच्या रससिद्धीचा लौकिक तत्कालीन वाङ्मयांत व कविपरंपरेंत रूढ असल्याचें दिसून आलें पाहिजे. रघुनाथ नारायण हणमंते यांचें ग्रंथकर्तृत्व म्हणजे राजव्यवहारकोश. हा कोश त्यांनी स्वतः रचिला असें नव्हे—त्याचे देखरेखीखाली रचिला गेला. ढुंढिराज व्यासाने तो 'रघुनाथमुदे कृतः' असा पुरावा आहे. अशा पद्धतीच्या ग्रंथकर्तृत्वाने त्याचें काव्यकर्तृत्व सिद्ध होण्यासारखें नाही. घुरनाथ नारायण शिवकालीन आहे, उत्तम विद्वान्, फारशी आरबी—भाषाप्रवीण असावा, तो मराठी दरबारांत वागलेला व समर्थभक्त असून श्रीरामलक्ष्मणांच्या मूर्ति समर्थांच्या मुद्दाम मागणीवरून त्यानेच कर्नाटकांतून पाठविल्या, त्याचें तंजावरास दीर्घकाल वास्तव्य असावें व त्यामुळे त्याला चंदावरकर किंवा तंजावरकर हें आडनांवहि मिळण्यास प्रत्यवाय नसावा या गोष्टींनी त्याच्या काव्यकर्तृत्वाची सिद्धि होत नाही. शिवाजीने व्यंकोजीस लिहिलेल्या पत्रांत त्यास पंडित म्हटलें आहे त्याचा अर्थ जाणता विद्वान् यापलीकडे नाही. 'कारभारी, विद्वज्जनांचा समागम करणारा, न्यायनीतिपरनिष्ठ' इत्यादि गौरवपूर्ण वर्णनांत तो वजनदार मुत्सद्दी, राजकार्यधुरंधर होता हीच गोष्ट व्यक्त होते. तो कवि असता तर तसा निर्देश साहजिकपणें शिवाजीने केला असता. जयराम पिंड्ये याने रघुनाथभट चाऊरकर याला पंडितवरिष्ठ

असें म्हटलें तरी नलोपाख्यानकर्त्याच्या इतर गुणांचा म्हणजे प्रत्यक्ष काव्यकर्तृत्वाचा त्याच्या ठिकाणीं अभाव दिसल्यामुळे त्याला जर नलोपाख्यानाचा कर्ता समजतां येत नाही असें प्रा. पंगु म्हणतात, तर त्याच न्यायाने रघुनाथ नारायण हणमंते हे पंडित, राजकारणपटु, विद्वानांचा परामर्श घेणारे होते एवढ्याने त्यांचे ठिकाणीं कवित्वशक्तीची उपस्थिति निशंःकपणें मानतां येत नाही. साधारणपणें रघुनाथ नारायण हणमंत्यांसारख्या मुत्सद्यांना राजकारणाच्या उलाढालीपुढे कवित्वाचा सूर लावण्यास किती अवसर मिळेल हें सांगतां येत नाही. याच कविपंचकातील निरंजनमाधव हा मुत्सद्दी व राजकारणी असून कवि होता, हें उदाहरण रघुनाथनारायणाचे बाबतींत निर्णायक होऊं शकत नाही. हें त्याच्या कवित्वाचें प्रत्यक्ष प्रमाण नव्हे. त्याचप्रमाणे प्रसिद्ध इतिहाससंशोधक कै. द. वि. आपटे व प्रा. ओतुरकर यांनी "शिवाजीच्या आज्ञेने मी हा कोश (राजव्यवहारकोश) रचला." असे रघुनाथनारायणाच्या तोंडचे शब्द उद्धृत करून "नलदमयंतीस्वयंवराचा कर्ता रघुनाथपंडित तो हाच" असा त्यांनी स्पष्ट अभिप्राय दिला आहे ही गोष्ट कविपंचककारांनी प्रमाण म्हणून उल्लेखिली आहे. नुसत्या अभिप्रायापेक्षा त्याच्या मागे कांही सबळ पुरावा असल्यास त्याचें विवेचन विशेष महत्त्वाचें होतें. तसें कांही दिसत नाही. तेव्हा प्रस्तुत प्रबंधकारांनी 'एकांत लेखनहि वाचनही करीतो' अशा दमयंतीस्वयंवरांतील ओळीवरून व वर दिग्दर्शित केलेल्या अनिश्चयात्मक साधनांवरून रामदासवर्णन, गजेंद्रमोक्ष व नलोपाख्यान या काव्यांचें कर्तृत्व रघुनाथ नारायण हणमंते यांस सुपूर्त केलें आहे, तें अस्सल पुराव्याच्या अभावीं मान्य होणें कठिण आहे. त्याचप्रमाणे "शिवकालांत गाजलेल्या इतर कोणत्याहि रघुनाथापेक्षा, रघुनाथपंत हणमंत्याचाच दमयंतीस्वयंवराच्या कर्तृत्वाशीं घनिष्ठ संबंध लागत असल्याने, तोच या सुप्रसिद्ध काव्याचा कर्ता होय असें निःशंकपणें मानण्यास हरकत नाही" हें विधानहि अस्सल पुराव्याच्या अभावीं धाडसाचें वाटतें. श्री. प्रियोळकरांच्या भूमिकेविषयी आक्षेप घेणें शक्य असेल, त्याला योग्य कारणेंहि दाखवितां येतील. परंतु हा सर्व नास्तिपक्ष झाला. त्यामुळे रघुनाथ नारायण हणमंते हेच नलोपाख्यानाचे कर्ते ही गोष्ट सिद्ध होते असें नाही. नवीन संशोधनाच्या अभावीं कांही निश्चयात्मक विधान करतां येत नाही.

या ग्रन्थांतील कवींच्या चरित्रविषयक चिकित्सेच्या माग अभ्यासकाच्या सत्यान्वेषणाचे बुद्धीला चालना देईल यांत शंका नाही. प्राचीन कविपंचकाचा हा एक अभिनंदनीय विशेष होय.

य. र. आगाशे

## २ ग्रंथांच्या सहवासांत—

या लहानशा पुस्तकांत प्रा. निरंतर यांनी "संपादक मित्रांच्या विनंतीवरून लिहिलेल्या समीक्षण-लेखांपैकी कांहीं लेख" मुंबईच्या परचुरेपुराणिक मंडळींनी संगृहीत केले आहेत. प्रो. निरंतर यांनी केलेली धावती समालोचनें देखील किती मार्मिक आणि चटकदार असतात हें पत्रिकेच्या वाचकांस नव्याने सांगावयास नकोच. प्रस्तुत संग्रहासाठी निवडतांना प्रा. निरंतर यांनी कांही वेगळी आणि विशेष दृष्टि ठेवली असेल असें नाही; आणि तरीहि यांतील प्रत्येक 'समीक्षण' हें स्वतंत्र लेख या संज्ञेस पात्र आहे. नव्हे, तर ज्यांनी मूळ पुस्तक वाचलें

नसेल अथवा वाचलें असूनहि तें (फारसें लक्षांत ठेवण्यासारखें नसल्याने !) ज्यांच्या स्मरणांतून गेलें असेल त्यांनाहि हे लेख स्वतंत्रपणें आकर्षक व अुद्बोधक वाटतील. निरंतर यांच्या भाषाशैलीला आणि विचारसरणीला अेक प्रकारची धार आहे. अशा लहान लहान समीक्षणांत तर, ते ग्रंथांतील अेक महत्त्वाचा प्रश्न अचूक अुचलतात आणि त्या केंद्राभोवतीं आपल्या विचारांचा कोश जणू निमिषार्धांत गुंफून काढतात. कांता, राक्षसविवाह, रणांगण, अपुरा डाव; माधव ज्यूलियन् यांचीं प्रेमगीतें यावरील समीक्षणें या दृष्टीने नमुनेदार आहेत.

तथापि सदर पुस्तकांत संगृहीत झालेल्या लहान लहान लेखांना समीक्षण म्हणण्यापेक्षाहि ते समीक्षणाच्या निमित्ताने लिहिलेले स्वतंत्र लेख आहेत असेंच मी म्हणेन. आणि त्यांतहि प्रा. निरंतर यांच्या मनाचा कल प्रचलित वाङ्मयांतून प्रचलित सामाजिक प्रश्नाकडे वळण्याला अधिक अनुकूल दिसतो— अधिक सरावलेला दिसतो. राक्षसविवाह, अनिरुद्ध प्रवाह, रणांगण यांवरील परीक्षणें वरील मतास पुष्टिकारक ठरतील. 'रणांगण'मध्ये मूळ लेखकाने प्रेम आणि स्त्रीसहवास यासंबंधी कांही मतें, प्रश्न आणि प्रसंग ग्रथित केले; निरंतर यांस त्यामागील प्रश्न महत्त्वाचा वाटला; आपलासा वाटला. त्यांनी रणांगणाच्या निमित्ताने अेक सुंदर, आणि प्रभावी निबंध लिहून टाकला. पण रणांगण या पुस्तकाने सदर प्रश्न मांडण्याचें काम कितपत केलें आहे. यासंबंधी निरंतर यांच्या समीक्षणांत पुरेसें विवेचन आढळत नाही. आणि कदाचित् ते त्या विवेचनांत शिरते,· तरीहि त्यांनी निःपक्षपाती फैसला दिलाच असता असें सांगवत नाही. तीच स्थिति क्षीरसागर यांनी लिहिलेल्या राक्षसविवाह या कादंबरीचीहि होते. वैवाहिक कुचंबणा हा निरंतरांचा आवडता विषय आहे. (प्रत्येक स्वतंत्र बुद्धीच्या माणसास तो तसाच वाटतो.) राक्षसविवाह कादंबरींत तोच विषय आहे. पण कादंबरीच्या कर्त्याने तो विषय कसा हाताळला आहे यापेक्षा त्या विषयाचें स्वरूप काय आहे यावरच निरंतरांच्या समीक्षणांची अधिक भिस्त असते !

सर्वच समीक्षणांत निरंतर यांनी सामाजिक चर्चेवर भागविलें आहे, असें मला म्हणायचें नाही. पण या पद्धतीने क्वचित् असें होण्याचा संभव असतो की अेकदा मध्यवर्ती प्रश्न महत्त्वाचा आहे, हे निरंतर यास मान्य झालें की लेखकाने तो महत्त्वाचा म्हणून हातीं घेतला की केवळ फॅशन् म्हणून हाताळला, की हातीं घेअूनहि त्याचें मातेरें केलें अिकडे यावें तितकें लक्ष निरंतर कधी कधी देत नाहीत.

माधव जूलियन् यांच्या प्रेमासंबंधी लिहितांना निरंतर यांनी ही सामाजिक दृष्टि तर दाखविली आहेच, पण भाव-काव्यावर लिहिणाऱ्या समीक्षकास आवश्यक अशी सहृदयता व कलज्ञताहि दाखविली आहे. प्रेमकाव्याला अेकीकडून दौर्बल्याचीं चिन्हें म्हणून टीका सहन करावी लागते; तर दुसरीकडून त्या गीतांचा प्रत्यक्ष कविजीवनाशीं कांही संबंध नाही म्हणून पुकारा करणारांची 'प्रेमळ' गर्दी सोसावी लागते. प्रा. निरंतर यांनी या दोन्ही प्रचलित पंथांच्या आहारीं न जातां माधवरावांच्या असाधारण प्रेमगीतांची जी समीक्षा केली आहे ती अभिनंदनीय आहे. या सुंदर प्रेमसमीक्षणाच्या शेवटीं मात्र निरंतर यांनी तांबे, माधवराव आणि शेली यांच्या प्रेमकल्पनांसंबंधी जें विवेचन केलें आहे, त्यांत स्थलसंकोचामुळे गोंधळ तरी झाला असावा, नाहीतर शेलीसंबंधी प्रा. निरंतर यांनी 'कांही टीकाकारां'वरून गैरसमज तरी करून घेतला असावा ! त्यांच्या म्हणण्याचा रोख असा की प्रेमभंगाच्या 'दारुण वास्तवतेंत शेलीचा चक्काचूर झाला,' परंतु माधवरावांनी मात्र आपल्या 'काव्यात्म जीवनाची

राख आपल्या हातानें सावडली' आणि 'ज्ञानप्रांतांत जिवावर अुदार होअून परिश्रम केले.' निरंतरांच्या या सुंदर लेखाचा हा 'अुत्तरक्रियात्मक' अुत्तरार्ध पाहून असें वाटतें की प्रत्यक्ष प्रेमाप्रमाणेच प्रेमकाव्यसमीक्षणांतहि अेकतानता फार वेळ टिकूं शकत नाही ! प्रेमाची राख केव्हा अेकदा सावडीन असें पांडित्यास झालेलें असतें की काय न कळे !

या पुस्तकांत परीक्षिलेलीं बहुतेक पुस्तकें कादंबरी, कथा, काव्य या ललित स्वरूपाचीं आहेत. तरी 'व्यक्ति आणि वाङ्मय' (ले. क्षीरसागर) या टीकात्मक पुस्तकाचेंहि परीक्षण यांतच अंतर्भूत केलें आहे. मूळ पुस्तकांत भाषाशुद्धि, लोकहितवादी यासारखे वादग्रस्त प्रश्न आहेत.

निरंतर यांनी क्षीरसागर यांजवर चिपळूणकरी वादपद्धतीचा आरोप करून त्या वादांत भरच घातली आहे ! तथापि येथे त्या वादांत शिरतां येत नाही.

प्रा. निरंतर यानी सदर पुस्तकाने समीक्षावाङ्मयांत सुंदर भर घातली आहे. ते स्वतः शास्त्रीय चिकित्सेचे मोक्ते असून अेकाहि समीक्षणास त्यानी 'पंतोजी पद्धतीं'त शिरूं दिलेलें नाही हें मी वाचकांचें व वाङ्मयाचें भाग्य समजतों. पुस्तकाचें मुद्रण निर्दोष आहे, तथापि बाह्यांग फारच खेडवळ वाटतें,याचा प्रकाशकांनी पुढील पुस्तकाचे वेळीं विचार करावा.

श्री. के. क्षीरसागर

## काव्यः —

**ओजस्विनीः—** कवि यशवंत; प्रका० के. भि. ढवळे, मुंबअी; मू. रु. १॥.

काय असेल तें असो, पण मराठी साहित्याच्या दृष्टीने हा अेक साडेसातीचाच योग म्हटला पाहिजे की त्यांतील जुन्या नामवंत कवींचे नवे काव्यसंग्रह केवळ 'नाम'वंतच निघावेत ! म्हणजे त्यांच्यावर अेकेकाळीं गाजलेल्या कवीचें नांव छापलेलें असतें, व त्या संग्रहाचें स्वतःचें नांवहि मोठें आकर्षक असतें. पण कवि जसजसे जास्त संग्रह बाहेर काढील तसतसें त्यांतील रसतत्त्व कमी होत जाअून दर्शनी मोहकपणा मात्र वाढत जातो. श्री. यशवंतांचा नवीन काव्यसंग्रह निघाला म्हणून कळतांच मात्र असें वाटलें की निदान येथे तरी अपेक्षाभंग होणार नाही– किंवा खरें म्हणजे वरील अपेक्षेचा आनंददायी भंग होअील. 'यशोगिरीं'तील नवीनाचा हव्यास व क्रांतीची तळमळ या ताज्या संग्रहांत पराकाष्ठेला गेली असेल का ? नांव 'ओजस्विनी' आहे, तेव्हा 'यश'स्वी अवस्थेची कांत टाकून आता कवि 'ओज'स्वी रूपांत तळपत असलेला येथे आपणांस दिसेल का ? अशा प्रश्नतरंगांत पुस्तक अुघडून वाचूं लागलों, तेव्हा मात्र कवीने 'नव्या किनाऱ्याकडे' या कवितेंत जें वास्तवता व स्वप्नरंजन यांमधील झगड्याचें चित्र रंगविण्याचा प्रयत्न केला आहे, तेंच चित्र प्रत्यक्ष आपल्या नजरेपुढे याच पुस्तकाच्या अंतरंग-बहिरंगस्वरूपांत किंवा 'यशोधन-भावमंथनां'तील कित्येक गीतें, व प्रस्तुत संग्रहांतील ३९ पैकी बहुतेक गीतें यांमधील विरोधरूपांत खडें झालें. विषयांतील तोचतोपणा, पद्यरचनेंतील तींच तीं वैशिष्ट्यें कल्पनांतील अेकसांची ठराविकपणा या गोष्टी या संग्रहांत आहेतच. परंतु केवळ त्यामुळेच कांही हा संग्रह कमी 'ओज'स्वी आहे असें मला म्हणावयाचें नाही. पण यांतील कांही निवडक कविता कवीच्या तोंडून अेकतांना ओजोगुणाची जी अपेक्षा

संग्रहाच्या अंतरंगाविषयीं रसिकाच्या मनांत उत्पन्न होते, ती प्रत्यक्ष संग्रह वाचल्यावर पूर्ण होत नाही, व याचें कारण कांहींसें कवीच्या व्यक्तित्वाच्या मर्यादा हें आहे असें वाटूं लागतें.

कवीच्या अंतरंगांत कांहीतरी चुळबुळ चालली आहे असें वाटतें, कांहीतरी झगडा चालू असल्याचा भास होतो, त्याची आत्मकेन्द्रित वृत्ति विशाल बनण्याचा प्रयत्न सुरू करते आहे असें दिसतें. श्री. यशवंतांची वैशिष्ट्यनिदर्शक ऋजुता व तळमळ हीं कांहीं गीतांत अजूनहि आढळतात. 'पुजारणीचा भाव', 'मन मराळ पाळरूं', 'गृहिणी मी, नच देवी', 'घरधन्यास', 'स्वच्छंद कवि', 'स्वैरिणी प्रतिमा' यांमध्ये 'यशोधनां'तील आर्जव व कळकळ यांची आठवण होते. ओजोगुणाची छटा 'दिशांचें सूक्त', 'युगंधरांचें पालुपद', 'सावध सावध' यांत थोडीशी प्रचीतीला येते, आणि बहिर्मुखतेची वृत्ति 'अखंड अर्घ्यप्रदान', 'द्या आम्हाला सुळीं' यांत अंधुक दिसूं लागते. पण लगेच त्यांतील मर्यादाहि स्पष्ट होऊं लागतात. सर्वसामान्य जीवनांतील अनुभव तळमळीने व्यक्त करण्यांत 'यश'स्वी असणारी काव्यशक्ति असामान्य, विशाल, अनुभूतींच्या आविष्कारांतून प्रकट होणाऱ्या श्रेष्ठ ओजस्विनीचें रूप येथे दाखवूं शकली नाही हें कळून चुकतें. इतरांपेक्षा या कवीचें निराळेंपण यांतील नावीन्याच्या व विशालतेच्या हव्यासांत दिसून आलें तरी, त्याची मर्यादाहि याच हव्यासाच्या काव्यमय आविष्कारांतील तुटकपणांत अनुभवाला येते.

कवीच्या प्रतिभेला त्याच्या जीवनदर्शनाने गौरव प्राप्त होतें. 'यश' मिळावयास कारण झालेले काव्यगुण 'ओज' प्रकट करावयास समर्थ असतीलच असें नाही. वाढत्या वयाबरोबर व्यावहारिक अनुभव वाढले म्हणजे जीवनविषयक अनुभूति वाढतेच असें नाही. शाब्दिकतेचा स्थूल रंग साधला तरी सौन्दर्यतत्त्वाची सूक्ष्म जाणीव झालेली असतेच असें नाही. हळहळीची परिणति निर्माणक्षम प्रक्षोभांत, तळमळीचा शेवट मानवतेंत व ऐतिहासिकाचें पर्यवसान भविष्यदर्शीत झालें तरच श्रेष्ठ कलेची निर्मिति होते. श्री. यशवंत हे चांगले कवि आहेत याबद्दल या संग्रहांतहि पुरावा मिळेल. परंतु परम ओजस्वी व प्रतिभावान् काव्यविधात्याच्या कविसृष्टींतच खरी ओजस्विनी सत्कला तरळत असते. दुर्दैवाने आधुनिक मराठी कवींच्या पहिल्या रांगेंत मानाचें स्थान मिळवलेल्या कवींच्या कृतींत अशी प्रतिभेची चमक दिसून आलेली नाही; प्रस्तुत संग्रहहि त्याला अपवाद नाही. वर उल्लेखिलेल्या कविता वाचनीय आहेतच. त्यांत या कवीचे विशेष गुण (जरा निराळ्या रचनतून) दिसून येतातच. पण कवितासंग्रहाच्या संख्येच्या वाढीशीं प्रतिभेच्या प्रगतीचें प्रमाण पाहूं जातां तें जास्त तर वाटत नाहीच, उलट ती कमी होत नाही ना अशी शंका येऊन हुरहूर वाटूं लागते.

प्रस्तुत संग्रहावरून असें दिसतें की यशवंतांना परावलंबी स्वास्थ्य व यश यांपेक्षा स्वैर स्वातंत्र्याची तहान लागलेली दिसते (स्वतंत्र कवि व स्वैरिणी प्रतिमा या कविता पाहाव्या), आपली वाढ खुंटल्याचें दुःख वाटत असून प्रगतीची तळमळ जाणवूं लागलेली भासते (सावध सावध ही कविता). त्यांच्या वैयक्तिक भावनेने सामाजिक विकासाकडे दृष्टि वळवलेली दिसते (युगंधरांचें पालुपद). या फरकाला अनुसरून पद्यरचनेनेहि मुक्तच्छंदाचें निराळें वळण घेतलेलें दिसतें. परंतु उपहासप्रधान सूर लावणें स्वभावतःच त्यांच्या वृत्तीला व शक्तीला जमत व पेलत नाही. त्याला लागणारा रुद्रस्वरूपी पुण्यप्रकोप आणि मूर्तिभंजक प्रतिमा हीं कवीच्या उत्कट व्यक्तित्वांतच सामावलेलीं असतात. 'ओजस्विनीं'त यांचा फक्त दर्शनी आभास होतो, नक्की खात्री पटत नाही. यांत मुक्तच्छटांचा मुखवट्यासारखा भास होतो. कारण पूर्वीच्या व्यक्तिगत, कौटुंबिक तऱ्हेच्या भावगीतांतील उमाळा व यांतील शाब्दिक

तळमळ या दोहोंची तुलना केली, तर जिव्हाळ्याचें प्रमाण या संग्रहांतील कवितांत तेवढें न दिसतां उलट केवळ नावीन्याची भुरळ तर कवीला नाही ना पडली असें वाटूं लागतें.

श्री. यशवंतांनी 'टीका'कार रसिकांना आरंभींच इशारा दिला आहे की ' रुचल्या न कांहि जर ओळी। पेटवा तयांची होळी। मिरवील शाश्वता व्योमीं–धूरहि तो गात नाम॥ आणि कांही ओळी आवडल्याच तर त्यांच्या 'मुंडावळि रचुनी माळीं। बांधुनि घ्या,' पण त्यांचें 'ध्येय काम' मात्र तें नव्हे! 'स्वच्छंद कवि' या कवितेमधील दर्शनींच पुनः छापलेल्या या उद्गारांतून डोकावणारी बेफिकीर वृत्ति केवळ टीकाकारांवरील रोषानें प्रेरित नसावी अशी आशा आहे. परंतु खरोखर कोणीहि कवि इतक्या निःस्पृहपणें काव्यनिर्मिति करीत राहील तर त्याची उत्तरोत्तर प्रगतीच होत जाईल. उणीवांच्या आणि मर्यादांच्या दिग्दर्शनानें तो चिडून जाणार नाही व त्यांच्या यथायोग्य जाणीवेने निराश न होतां अधिकाधिक सरस प्रयोग करीत राहील. एवढी अनासक्त वृत्ति अंगीं येणें कठीण असलें तरी तें प्रगतीला अवश्य आहे. कवि यशवंतांनी असें अनासक्त राहावयाचें ठरविलें आहे. त्यांत ते यशस्वी होवोत व तें त्यांच्या प्रतिभेच्या प्रगतीला साहाय्यक होवो अशी सदिच्छा त्यांचा कोणीहि चाहता व्यक्त करील.

ना. ग. जोशी

## कादंबरीः—

**जळतें रहस्यः**—अनुवादक–बा. भ. बोरकर; प्रका०—स्कूल अँड् कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर; मूल्य २ रु.

स्टीफन् झ्वाइग् या पाश्चात्य लेखकाच्या कांही ललितकृतींचा परिचय निरनिराळ्या लेखकांनी मराठी वाचकांना यापूर्वी करून दिला आहेच. स्टीफन् झ्वाइग्संबंधी निर्माण झालेल्या अपेक्षा आणि औत्सुक्य वृद्धिंगत करणारा हा अनुवाद श्री. बोरकर यांनी त्याच्या The Burning Secret या प्रसिद्ध कादंबरीचा केलेला आहे. कादंबरीचें कथानक आटोपशीर असून प्रमुख पात्रांची संख्या तीन आहे. बॅरन ओटो नांवाचा एक तरुण ऑस्ट्रियन आठ दिवसांची रजा घेऊन विश्रांतीकरिता एका हॉटेलांत येतो. फ्राउ ब्लुमेंताल नांवाची एक स्त्री आपल्या दहाबारा वर्षांच्या एडगर नांवाच्या मुलाला घेऊन त्याच हॉटेलांत हवापालट करण्याकरिता येते. बॅरन ओटो हा तरुण, सुंदर आणि सहवासाचा– विशेषतः स्त्रियांच्या– भुकेला असतो; आणि त्याला हॉटेलमधील जीवन असह्य होईलसें वाटतें. कोणीहि ओळखीचें दिसेना. ब्लुमेंताल दृष्टीस पडल्यापासून तिच्याशीं ओळख करून घेण्याची आणि हळूहळू प्रेमसौधाच्या चढत्या पायऱ्या आक्रमण्याची इच्छा त्याला झाली. एडगरच्या मध्यस्थीने त्याने हें कार्य साधलें. वैवाहिक जीवनांतील उल्हासप्रचुर सुखांना पारखी झालेली असमाधानी ब्लुमेंताल या नव्या प्रलोभनाच्या आहारीं जाऊं लागली हें कथेच्या घटनेंतील मुख्य सूत्र आहे. तथापि एडगरच्या भावनांचीं परिवर्तनें हें कथानकांतील प्रमुख आस्थाकेंद्र आहे.

शिस्तीचा भोक्ता असलेला आणि आपल्या उद्योगांत गढलेला बाप, भोगलालस परंतु वासनांच्या अतृप्ततेमुळे अस्थिरप्रकृति असलेली आई आणि समवयस्क मुलांच्या सांनिध्या-

चा अभाव अशा परिस्थितींत वयाचीं दहावारा वर्षे होईपर्यंत एडगर वाढतो. एडगरला ज्याची कल्पना होणें शक्य नव्हतें अशा स्वार्थी हेतूने बॅरनने त्याच्याशीं आपणहून परिचय करुन घेतला. थोड्याच अवधींत या साध्या भोळ्या मुलाचें मन त्यानें जिंकलें. बॅरन् त्याच्या बाल्याशीं तद्रूप झाला. एक प्रौढ व्यक्ति आपल्याशीं इतक्या सलगीने वागूं शकते हा अनुभव एडगरला तरी त्याच्या आयुष्यांत प्रथमच येत होता. त्या दिवसापासून त्याचें अंतःकरण बॅरन्-च्या मालकीचें झालें.

परंतु बॅरन्ला एडगरचा उपयोग मध्यस्थ म्हणून करुन घ्यावयाचा होता. एडगरच्या सुंदर आईची शिकार हें त्याचें साध्य होतें, आणि तें साध्य हस्तगत होतें असें दिसतांच एडगरची तो उपेक्षा करूं लागला, त्याला टाळूं लागला, एवढेंच नव्हे तर कोणत्या ना कोणत्या तरी कारणाने त्याला दूर ठेवण्याचा तो बुद्धिपुरःसर प्रयत्न करूं लागला. एडगरला या स्थित्यंतराचा बोध होईना. त्याच्या या प्रयत्नांत आपल्या आईचेंहि अंग आहे अशी शंका त्याला येऊं लागली, तेव्हा तर हें कोडें असावें तरी काय याच्या विचाराने तो अत्यंत अस्वस्थ झाला. एडगर धड लहान नव्हता, आणि धड या सर्व प्रकाराचें यथार्थ आकलन करून आपणहून बाजूला होणें जरूर आहे हें समजण्याइतका मोठाहि नव्हता. तिघांनाहि परिस्थिति दुःसह झाली पण जगांतील सहृदयतेचें दर्शन ज्याला प्रथमच होत होतें त्याला ती नाहीशी झाल्याबरोबर ही परिस्थिति अधिकच बोचक झाली. बॅरन् आणि आई हे एकमेकांला निकट येत आहेत हें एडगरला दिसलें, परंतु त्यांच्या संबंधाच्या स्वरूपाचें आकलन त्याच्या बालमनाला शेवटपर्यंत झालें नाही. बॅरन् ओटो अधीरतेने अतिप्रसंग करणार इतक्यांत आसपास कोणी नसेल अशा कल्पनेने ब्लुमेंताल ओरडते. एडगरला वाटतें की हा शारीरिक हल्ल्याचा कांही प्रकार असावा. आणि ओटोला दोनचार गुद्दे लगावून तो आपल्या आईला सोडवतो. ऐनवेळीं मदत केली यावद्दल आईने कृतज्ञ असावयास पाहिजे अशी त्याच्या बालमनाची कल्पना, पण दुसरे दिवशीं याच्या उलट त्याला अनुभव येतो. झाल्या प्रकाराबद्दल ओटोची क्षमा माग असा आईचा आग्रह पाहून त्याला अधिकच अचंबा वाटतो आणि तो आपल्या आजीकडे पळून जातो. विकारवशतेचा पहिला भर ओसरल्यानंतर नैतिक अधःपातापासून न कळत का होईना सोडविल्याबद्दल ब्लुमेंतालला आपल्या मुलाबद्दल कौतुक व अभिमान वाटतो.

या कथानकांत एडगरचीं मानसिक आंदोलनें अत्यंत कौशल्यानें आणि कलापूर्ण रीतीने रंगविल्यामुळे ही लघुकादंबरी हृदयंगम झाली आहे. अनुवादाची भाषाहि अकृत्रिम आहे. पाश्चात्य वाङ्मयांतील उत्तमोत्तम कृतींचा परिचय मराठी वाचकांना करून देण्याचें कार्य श्री. बोरकर यांनी केल्यास मराठी वाङ्मयांत भर पडेलच पण आपल्या इकडील कादंबरीकारांना मार्गदर्शनहि होईल, आणि पर्यायाने मराठी कादंबरीवाङ्मयाचा दर्जा उंचावण्यास अशा अनुवादांची मदत होईल यांत शंका नाही.

श्री. रा. पारसनीस

कांही अपरिहार्य अडचणीमुळे या विभागांतील बराच मजकूर आयत्या वेळीं मागे ठेवावा लागला आहे.

—संपादक

